

# महाराष्ट्र वाङ्मय.

"The present is full of promise, and there is every likelihood that before long the Marathi language will be in a position to take the first rank among the cultivated languages of modern India."

*M. G. Ranade.*

"खरें वाङ्मय जें आहे, तें सर्व जगाच्या उपकारास्तव असतें. सर्व मनुष्यजातीचें किंवा प्राणिमात्राचें कल्याण व्हावें हा उत्तम वाङ्मयाचा पवित्र हेतु असतो."

गणेश जनार्दन आगाशे.

हें व्याख्यान

## विनायक कोंडदेव ओक

ह्यांनीं लिहिलें.

१९०६.

किंमत ६ आणे.



# अर्पणपत्रिका.

ज्ञानदेवापासून आजपर्यंतचे सगळे कवि, वेताळपंचविशी लिहिणारापासून आजपर्यंतचे सगळे गद्यपद्यग्रंथकार, वर्तमानपत्रकर्ते, मासिक पुस्तककर्ते, दक्षिणा प्रैझ कमिटी, डेकन ट्रान्सलेशन सोसायटी, ग्रंथप्रसारकमंडळी बडोदें, ह्यांसारख्या संस्था, सरकारचें विद्याखातें, महाराज सयाजीराव गायकवाडांसारखे विद्याभिलाषी राजे, ग्रंथकारांस उत्तेजन देण्याच्या सद्‌बुद्धीनें त्यांचे ग्रंथ छापून प्रसिद्ध करणारे उदारधी छापखानेवाले, तसेच ग्रंथप्रकाशक, आणि स्वशक्त्यनुसार महाराष्ट्र वाङ्मयाच्या उद्धारार्थ, प्रत्यक्षतः किंवा परंपरया, मनोभावें परिश्रम करणारे, ह्या सर्वांस हें व्याख्यान, अत्यंत पूज्य भावानें अर्पण करितों.

वि. कों. ओक.



# प्रस्तावना.

आमच्या कुलस्त्रियांस महाराष्ट्र वाङ्मयाच्या संबंधानें थोडें कांहीं सांगावें, म्हणून हीं पृष्ठें लिहिलीं आहेत. ह्याला व्याख्यान हें नांव फार मोठें आहे. तरी दुसरें यथायोग्य नांव सुचलें नाहीं, म्हणून व्याख्यान म्हटलें आहे. एकाद्या टोलेजंग इमारतीचें यथातथ्य वर्णन करतां येत नसलें म्हणजे तिचें महत्त्व दाखविण्याकरितां तिच्या भिंतींतली एक वीट काढून दाखवावी, त्यासारखें हें झालें आहे. तरी, ती वीट त्या इमारतींतली आहे, एवढ्यावरून तरी तिचा मान होईल अशी आशा आहे.

ह्या व्याख्यानाच्या अवलोकनानें आमच्या कुलस्त्रियांस सांप्रतच्या महाराष्ट्र वाङ्मयाचा अभ्यास करण्याची इच्छा व्हावी, आणि हें महाराष्ट्र वाङ्मय कोणत्या साधनांनीं कोणत्या स्थितीस न्यावें म्हणजे आपण कृतकार्य होऊं हें त्यांच्या लक्षांत यावें, एवढाच मुख्य हेतु आहे. हा हेतु परमेश्वर सफल करो.



# अनुक्रमणिका.

# महाराष्ट्र वाङ्मय.

**श्रीमती सन्मान्य भगिनींनो,**

आज तुम्हांला महाराष्ट्र वाङ्मयाविषयीं थोडेंसें सांगायाचें आहे. त्यांतला हेतु एवढाच आहे कीं, त्यावरून आपल्या वाङ्मयाची महती तुमच्या लक्षांत यावी. हा कांहीं नवा प्रकार नाहीं. एका शितावरून हांड्याची परीक्षा करितात. दाहाहजार तोळयांच्या सोन्याच्या लगडींतल्या एका गुंजेस जो कस लागतो, तोच त्या सगळ्या सोन्यास लागतो. अथवा रसाची गोडी म्हणून जी काय असते, ती, त्याच्या एका थेंबांत आणि घागरींत सारखीच असते. तसा हा प्रयत्न आहे. कृपा करून लक्ष द्यावें.

महाराष्ट्रग्रंथसंग्रह हें सगळें महाराष्ट्र वाङ्मय होय. ह्याचें विवेचन करण्यास ह्याचे दोन मुख्य भाग कल्पिले पाहिजेत; एक पद्यकालवाङ्मय आणि दुसरा गद्यकालवाङ्मय. पहिल्यास पद्यकालवाङ्मय म्हणण्याचा आशय एवढाच कीं, ह्या काळांत मराठीमध्यें गद्यापेक्षां पद्य अधिक संग्रहित झालें आहे. आणि त्या वेळेच्या पुढच्या भागास गद्यकालवाङ्मय आम्ही नांव देतों. कांकीं, त्यांत पद्यापेक्षां गद्य अधिक संग्रहित झालें आहे, आणि होत आहे. ह्यांपैकीं प्रथम पद्यकालवाङ्मयाचा विचार करावयाचा आहे.

## १. पद्यकालवाङ्मय.

ह्याची कारकीर्द, स्थूल मानानें ज्ञानेश्वरांपासून रामजोशीबुवांप-

र्यंत—ह्मणजे अजमासें इ० स० १२७८ पासून इ० स० १८२० पर्यं-
तची धरावी. आणि, कवि जितका जितका प्राचीन असतो, तितके तितके
त्याच्या कथनाचे विषय गहन असून, त्याच्या चर्चेची पद्धति अधिक
कठिण असते, हा जो एक नियम आहे, ह्याची सत्यता ह्या कवींचीं
काव्यें पाहून पटवून घ्यावी. ज्ञानेश्वरी कळायास फार कठिण
आहे, आणि जोशीबावांच्या लावण्या सोप्या आहेत. ह्या मुदतींत
जें वाङ्मय मराठींत उत्पन्न झालें, त्याचा जनक संस्कृत
वाङ्मय होय. मराठींत जें काय मुख्यत्वेंकरून ह्या कालांत
संग्रहित झालें आहे, त्यास मुख्य आधार संस्कृताचा आहे. ह्या
वेळच्या मराठींत आहे, आणि संस्कृतांत मुळीं कोठें नाहीं, असें
सहसा कांहीं सांपडावयाचें नाहीं. म्हणून मराठींतल्या ज्ञानसं-
ग्रहाबद्दल मूळ संस्कृत ग्रंथकारांचें अभिनंदन करण्याचा परिपाठ
महाराष्ट्र कविश्रेष्ठांचा आहे. संस्कृतांतला सगळ्यांत मोठा जुना ग्रंथ
महाभारत होय. त्याचा कर्ता व्यास. त्याविषयीं म्हटलें आहे:—

**ओव्या.**

पडला अज्ञानांधकार बहुत न दिसे कांहीं वस्तुजात
अडखळोनि क्षणक्षणा पडत गर्भगर्तेंत[1] जीव हे. १.
काम क्रोध मद मत्सर हे थोर हिंडती तस्करें[2]
पुण्यधन सर्वत्र हरोनि नेती क्षणार्धें. २.
ऐसें निबिडतम[3] जाणोन तो सत्यवतीहृदयरत्न
उगवला सूर्यनारायण वेदव्यास महाराज. ३.
कृपाळ तो वेदव्यास तारावया जड जीवांस
भारत निर्मिलें सप्त रस कीं पंचम वेद सुरस हा. ४.

**श्रीधर.**

---

१ गर्भ हा खळगा. २ चोर. ३ फार अंधेर.

भगिनींनो, आपलें मराठीचें सगळें भांडार जरी संस्कृत वाङ्मया-पासून निघालें आहे, तरी, त्याची थोरवी संस्कृत वाङ्मयाहून कमी नाहीं. कांकीं, वाङ्मयाचें श्रेष्ठत्व अर्थावर आहे, भाषेवर नाहीं. दागिन्याची किंमत त्याच्या वजनावर असते, स्वरूपावर नसते, हें तुह्मांला ठाऊकच आहे. प्राकृताची योग्यता ज्ञाते कमी समजत नाहींतः—

### ओव्या.

हां हो नवल नोहे देशी मराठी बोलिजे तरी ऐशी
वांणें[1] उमटतां हे आकाशीं[2] साहित्य[3] रंगाचें. १.
आतां आयती गीता जगीं सांगें मराठिया[4] भंगीं
येथ कें विस्मया लागीं ठाव आहे. २.

**ज्ञानेश्वर.**

### ओव्या.

संस्कृत ग्रंथकर्ते ते महा कवि मा प्राकृतीं काय उणीवी
नवीं जुनीं ह्मणावीं कैसें कधीं सुवर्ण सुमनें. १.
कपिलेचें ह्मणावें क्षीर मा इतराचें काय नीर
वर्णास्वादें एकचि मधुर दिसे साचार सारिखें. २.
जें पाविजे संस्कृत अर्थें तेंचि लाभे प्राकृतें
तरी न मानावया येथें विषम चित्तें तें कायी. ३.
देशभाषावैभवें प्रपंच परमार्थीं पालटलीं नांवें
परी रामकृष्णादि नामां नव्हे भाषावैभवें पालट. ४.
संस्कृत वाणी देवें केली प्राकृत काय चोरापासूनि आली
असो या अभिमानभुली वृथा बोली काय काज. ५.

**एकनाथ.**

---

१ प्रकार. २ स्वरूपीं. ३ श्रवणसुख. ४ भाषेनें.

## ओव्या.

प्राकृत आणि संस्कृत दोनीमाजी एकचि अर्थ
जैसा दोन स्त्रियांचा एक नाथ दोनी हस्त एकाचेची. १.
दोन दाढा एकचि स्वर पाहाणार एक दोन नेत्र
किंवा दोन पात्रांत पवित्र एकचि दुग्ध घातलें. २.
अबळांस न कळे संस्कृत वाणी जैसें आडांतील पाणी
परी दोरपात्रांवांचुनी अशक्त जनीं केंवि निघे. ३.
तें तडागासि येतां त्वरें तात्काळचि तृषा हरे
भोळे जन तारावया ईश्वरें प्राकृत ग्रंथ निर्मिले. ४.
मुख्य संस्कृत पहावें तरी तें अबळां नेणवे
महागज कैसा बांधवे कमलतंतु घेउनी. ५.
उत्तम वस्त्रें लेती नृपती तीं दुर्बलासी प्राप्त न होती
मग घोंगडी पांघरती शीत उष्ण निवारणा. ६.
गीर्वाण हें शशिमंडळ अद्भुत त्याची प्रभा ही प्राकृत
संस्कृत ग्रंथ वर्णिती पंडित अर्थ प्राकृत करिती कीं. ७.
कष्टेंवीण राज्य आलें हाता तरी कां हो सोडावें तत्वता
प्राकृत भाषा लेवोनि कथा लाभ श्रोता सेविजे ते कीं. ८.
संस्कृत इक्षुरस अपार त्याची प्राकृत हे साखर
सुज्ञ जन सुकुमार सेवणार प्रेमरसीं मिळवूनियां. ९.

श्रीधर.

रस हा भाषणाचा जीव आहे. तो खरा आणि चांगला असला ह्मणजे भाषेची किंवा शब्दरचनेची मातब्बरी त्यापुढें राहात नाहीं. लाडक्या मुलानें बापास काका ह्मटल्याचा किंवा नांवानें हाक मारल्याचा कधीं राग येत नाहीं. पंतांनीं आपल्या मराठी काव्याविषयीं ह्मटलें आहे:—

## श्लोक.

रामाचें रचिलें चरित्र मुनिनें वाल्मीकिनें संस्कृतीं
नाहीं हानि कदापि अन्य कविंहीं तें वर्णितां प्राकृतीं
मुक्तांचा[1] रचिलाचि हार वहिला जो रेशिमाच्या गुणें[2]
तो कार्पासगुणेंकरून[3] करितां काय प्रभेला उणें. १.

गीर्वाणें[4] राघवाचें यश रसिक जनां लागतें फार मिष्ट
तैसें न प्राकृतानें अचतुर म्हणती मानिती तें न शिष्ट
पीतां गोक्षीर कार्तस्वरमणिचषकें[5] देतसे जेविं गोडी
सारज्ञाला पलाशद्रुमदलपुटकें[6] सेवितां ते न सोडी. २.

## आर्या.

प्राकृत म्हणोनि निर्भर[7] हांसतिल अतज्ज्ञ[8] नीच मत्कृतिला[9]
परि जाणशील बा तूं रसिक कविवरा मनीं चमत्कृतिला. १.

ज्वरितासि शर्करा जशि कटु होय खळांसि सुरसही कविता
शिष्टां पद्मां[10] सुख दे दुष्टां घूकांसि[11] ताप दे सविता[12]. २.

ह्यावरून तुमच्या लक्षांत येईल कीं, भाषाभेदासुळें वाङ्मयाच्या योग्यतेस तिळभरही उणेपण येत नाहीं. सामान्यत्वें वाङ्मयाचें माहात्म्य समर्थांनीं सांगितलें आहेः—

## ओव्या.

आतां श्रवण केलियाचें फल क्रिया पालटे तात्कळ
तुटे संशयाचें मूळ एकसरा. १.

---

१ मौत्यांचा. २ दोऱ्यानें. ३ कापसाच्या दोऱ्यानें. ४ संस्कृतानें. ५ सुवर्णाचें जडावाचें पात्र. ६ पळसाच्या पानाचा द्रोण. ७ पूर्ण. ८ अजाणते. ९ माझ्या काव्याला. १० कमलां. ११ घुबडांस. १२ सूर्य.

मार्ग सांपडे सुगम नलगे साधन दुर्गम
सायुज्य मुक्तीचें वर्म ठायीं पडे. २.

नासे अज्ञान दुःखभ्रांति शीघ्रचि येथें ज्ञानप्राप्ति
ऐशी आहे फलश्रुति इये ग्रंथीं. ३.

आळशी तेचि साक्षेपी होती पापी तेचि पस्तावती
निंदक तेचि वंदूं लागती धर्ममार्गासी. ४.

बद्धचि होती मुमुक्ष मूर्खचि होती अतिदक्ष
भक्तचि पावती मोक्ष भक्तिमार्गें. ५.

ऐशी याची फलश्रुति श्रवणें चुके अधोगति
मनासि होय विश्रांति समाधानें. ६.

दासबोध.

सगळ्या वाङ्मयाची गोष्ट असो. परंतु एका उद्योगपर्वाच्या पठणाचें माहात्म्य वर्णिलें आहेः—

ओव्या.

उद्योगपर्व रसिक सार भारतामाजी सुरस फार
बहुत नीति बहुत विचार ज्ञान अगाध निरूपिलें. १.

उद्योगपर्व करितां श्रवण सर्व उद्योग होती संपूर्ण
स्वस्थ होय सदा मन सकळ विघ्नें निरसूनियां. २.

उद्योगपर्व करितां श्रवण केले तेणें सहस्र यज्ञ
शत्रुपराजय संपूर्ण कीर्तिवर्धन सर्वदा. ३.

संतति संपत्ति आयुष्यवर्धन भक्ति मुक्ति सदा समाधान
उद्योगपर्व करितां श्रवण इतकें फल प्राप्त होय. ४.

श्रीधर.

असें वाङ्मयाचें स्तुतिस्तोत्र करावें तितकें थोडें वाटतें. संस्कृतांतलें सगळें ज्ञानभांडार आपल्या मध्यमकालीन महाराष्ट्र कवींनीं मराठींत आणून ठेविलें आहे—अमृत फार खोल विहिरींत होतें तें वर पाटांत आणून सोडिलें आहे—हे आपल्या राष्ट्रावर त्यांचे महदुपकार आहेत. ते कवि असून परमेश्वरभक्त होते. त्यांमध्यें ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम, वामनपंडित, रामदास, मुक्तेश्वर, मोरोपंत, श्रीधर, अमृतराय, महीपति, रघुनाथपंडित, अनंतफंदी, रामजोशी इत्यादि प्रमुख होते. ह्यांचे ग्रंथ ह्मणजे केवळ कल्पवृक्ष आहेत. ज्यांस जें पाहिजे असतें, त्यांस तें ह्यांत सांपडतें. शोधणारा मात्र पाहिजे. परमेश्वरभक्ति कशी करावी, राज्यकारभार कसा चालवावा, सत्समागम कसा जोडावा, शत्रूशीं कसें वर्तावें, मित्र कसे संपादावे, संसार कसा थाटावा, पित्यांनीं पुत्रांशीं कसें वागावें, पुत्रांनीं पित्यांशीं कसें वागावें, भ्रतारांनीं पत्न्यांस कसें वागवावें, पत्न्यांनीं भ्रतारांशीं कसें वागावें, हें, आणखी ह्या जगांतल्या व्यवहारांत स्थितिपरत्वें माणसांस जे अनेक अधिकार प्राप्त होतात, आणि तदनुसार त्यांस अनेक प्रकारें वर्तणें भाग पडतें, त्यांच्या संबंधी उत्तमोत्तम तत्त्वांचें कथन मराठी वाङ्मयांत आहे. आणि भगिनींनो, तुह्मां स्त्रियांस ह्या जगामध्यें मुख्यत्वेंकरून दोन अधिकार प्राप्त व्हावयाचे असतात. एक पत्नीचा आणि एक मातेचा. हे अधिकार अत्यंत महत्वाचे आहेत. ह्यांवर केवळ आमच्या कुलांचेंच नव्हे, तर आमच्या सगळ्या राष्ट्राचें कल्याणाकल्याण अवलंबून राहावयाचें आहे. "न मातुः परदैवतं" हें तर आपलें फार प्राचीन व्रत आहेच. पण, अर्वाचीन कालींही मातेचा अधिकार फार मोठा मानितात. इतरांची गोष्ट एकीकडे असो. पण अर्वाचीन इतिहासांत गाजलेला कर्दनकाळ जो नेपोलियन बोनापार्ट—ह्मणजे कांहीं वर्षेंपर्यंत ज्यानें सगळ्या पृथ्वीस कंपायमान करून

सोडिलें होतें—त्यास कोणीं एकदा असा प्रश्न केला कीं, "राष्ट्रास मोठेपण कशानें येतें ?" त्यास त्यानें उत्तर दिलें कीं "सन्मातांनीं !" ह्याचें ठळक उदाहरण आपले श्री**शिवाजी महाराज**ही होते, हें तुम्हांला ठाऊक आहे. म्हणून ह्याकडे तुमचें मन वळावें—महाराष्ट्र वाङ्मय केवढें आहे ह्याचें दिग्दर्शन तुह्मांस अल्पस्वल्प व्हावें, ह्यासाठीं त्यांतल्या उगाच थोड्याशा ठोकळ ठोकळ गोष्टी तुम्हांस सांगतों.

भगिनींनो, तुम्हांला ठाऊक आहे कीं, मनुष्य हें आपल्या मनाच्या स्वाधीन असतें; आणि मन हें, समजुतीच्या स्वाधीन असून, समजुतीस दृष्टांत जितकें वळवितात तितकें दुसरें कांहीं वळवूं शकत नाहीं. त्या दृष्टांतांचें माहात्म्य विलोम पद्धतीनें वर्णिलें आहे:—

### ओव्या.

अमृताहूनि गोड अन्न परि रुचि नये शाखेविण
दृष्टांतावीण ग्रंथ संपूर्ण रसीं न चढे सर्वथा. १.
अलंकारें शोभे नितंबिनी कीं गगन मंडित उडुगणीं
कीं मानससरोवर राजहंसावांचोनी शोभा न दिसे सर्वथा. २.
कीं मननाविण श्रवण कीं सद्भावावीण कीर्तन
कीं क्षेत्र जैसें बीजेंविण दृष्टांतावीण ग्रंथ तैसा. ३.
कीं सभा जैशी पंडिताविण कीं सुस्वराविण गायन
कीं शुचिविण तपाचरण दृष्टांतावीण ग्रंथ तैसा. ४.
कीं विरक्तीविण ज्ञान कीं प्रेमेंविण भजन
कीं दानेंविण भाग्य पूर्ण दृष्टांताविण ग्रंथ तैसा. ५.

श्रीधर.

हें अगदीं खरें आहे. मनुष्य कितीही हटवादी असला, तरी त्याला तीन आणि चार सात कबूल करावे लागतात, साहा किंवा आठ म्हणतां येत नाहींत. तसें थोडेंसें दृष्टांतांचें आहे. ते मनुष्यास भलत्याच दिशेकडे वळूं देत नाहींत. आणखी, मोठीं माणसें आपल्या पक्षाकडे जनांचीं मनें वळवून घेऊन स्वकार्यें सिद्धीस नेतात, त्यांस मुख्य साधन दृष्टांत हेंच असतें. हें जसें वाङ्मयपठणानें साध्य होतें, तसें दुसऱ्या कशानेंही साध्य होत नाहीं. कांकीं, विद्वान् ग्रंथकार आपल्या कोटिक्रमाच्या सिद्ध्यर्थ दृष्टांतांचाच फार उपयोग करीत असतात. श्रीधराच्या ग्रंथांत प्रसंगोपात दृष्टांतांची जशी वृष्टि होत असतेः—

अरसिकांस कवित्व सांगणें कसें व्यर्थ होतें ह्याचें वर्णनः—

**ओव्या.**

जैसें अन्न केलें स्वादिष्ट परी जेवणारे बैसले रोगिष्ट
तरी ते सुग्रणीचे कष्ट शून्यस्थानीं पडले कीं. १.
षड्रस अन्नें परिकर परी तें जेऊं न जाणे खर
पंकगर्तेंत[1] सुंदर हिरा नेऊन ठेविला. २.
सुधारस उकरडां ओतिला गर्भांधासी आरसा दाविला
कीं दिव्य मंचक घातला चिताभूमीस नेऊनी. ३.
कागा समर्पिलीं अमृतफळें उष्ट्रापुढें सोलींव केळें
कीं जे मृतप्राय निजेले त्यांस पूजिलें व्यर्थ जेवीं. ४.
कीं अनर्घ्य[2] रत्नमाला घातली दिवाभीताचे[3] गळां
कीं कस्तूरीटिळक रेखिला सूकराचे[4] ललाटीं. ५.

रामविजय.

१ चिखलांतल्या खळग्यांत. २ दुर्मिळ. ३ घुबड. ४ डुकर.

परमेश्वरभक्तीपुढें इतर विषय तुच्छ वाटतात, हें दर्शविण्याकरितां म्हटलें आहेः—

## ओव्या.

सुधारस त्यजोनि निर्मळ कोणास आवडे हळाहळ[1]
उत्तम सांडोनि तंदुळ सिकतां[2] कांहो शिजवावी. १.
त्यजोनि सुंदर रायकेळें कोण भक्षील अर्कीफळें[3]
कल्पद्रुमीं[4] जो विहंगम खेळे तो नातळे[5] बाभुळेसी. २.
मानससरोवरींचा राजहंस पाहीं कदा न राहे उलूकगृहीं[6]
बुडी दिधली क्षीराब्धिडोहीं दग्ध वन नावडे त्या. ३.
नंदनवनभ्रमर कदाकाळीं अर्कपुष्पीं रुंजी न घाली
जेणें इंद्रभुवनीं निद्रा केली खदिरांगारीं[7] न निजे तो. ४.
रंभेतुल्य जाया चांगली सोडोनि प्रेत कोण कवळी
तैसी भक्तीं आवडी धरिली कदा विषयीं न रमे तो. ५.

श्रीधर.

रूपसादृश्य आणि गुणभेदः—

## ओव्या.

बकांसंगें असती मराळ[8] दिसती सारिखे शुद्ध धवळ
परी क्षीर आणि जळ करिती वेगळें हंसची. १.
वायसांत[9] बसे कोकिळ त्यासारखी दिसे केवळ
परी येतां वसंतकाळ पंचम स्वर आळवी. २.
स्फटिकांत मुक्ताफळ जाण दिसे सारिखें समसमान
मुक्त जोहरी काढिती निवडून करिती जतन जीवेंसी. ३.
पाषाणांत परिस पूर्ण दिसे तैसाचि जड कठिण
परी तो करी लोहाचें सुवर्ण कृष्णवर्णातें लपवोनी. ४.

१ विष. २ वाळू. ३ धोतऱ्याचीं फळें. ४ कल्पवृक्ष. ५ न शिवे. ६ घुवड. ७ खैराच्या निखाऱ्यांवर. ८ हंस. ९ कावळा.

कस्तूरी आणि मृत्तिका दिसे रंग एकसारखा
परी मृगमद[1] सुवासें सकळिकां श्रीमंतांसी निववीतसे. ५.
तक्र दुग्ध एकवर्ण परी दुग्ध गोड सकळांसी मान्य
तैसें संतांचें रूप जाण इतरांसमान न गणवे. ६.

**श्रीधर.**

रामकृपा झाली ज्यावर त्यास कांहीं कमी नाहीं:—

**ओव्या.**

क्षीराब्धितटीं बैसला सर्वकाळ त्यासी क्षुधा कासया बाधिल
दीपाची चिंता कां लागेल दिनमणि[2] समीप असतां पैं. १.
राहतां कल्पतरूजवळी कां दुःखित कामनाव्याळीं.
गंगाजळीं शेज केली त्यासी वणवा काय करी. २.
वारणविदारकांचे[3] संगतीं जो बैसला अहोरातीं
जंबुक त्यासी बाधा करिती कल्पांतींही घडेना. ३.
जो नित्य करी सुधारसपान त्यास विष बाधेल काय दारुण
स्वरूपीं सदा सावधान दुष्कृत कैसें त्यापाशीं. ४.
कामधेनु घरीं असतां मग दारिद्र्य न बाधी तत्वतां
हुताशनें[4] सतेज धडकतां शीत कैचें उरेल. ५.
तैशी रघुवीरकृपा ज्यावरी पूर्ण त्यास न बाधी विषयहुताशन
रामचरित्रीं गुंतलें मन इतर श्रवण नावडे. ६.

**श्रीधर.**

श्रीराम वनवासास गेला, आणि त्याच्या वियोगदुःखानें दशरथानें प्राण सोडिला. ह्यामुळें कौसल्येवर पुत्रवियोगदुःख आणि भर्तृमरणदुःख हीं एकदम कोसळलीं. त्यांचें वर्णन केलें आहे:—

---

१ कस्तूरी. २ सूर्य. ३ सिंह. ४ अग्नि.

## ओव्या.

पायासि डंखिजे महाव्यांळें[1] तों मस्तकीं वृश्चिकें[2] ताडिलें
कीं वणव्यांत प्राणी सांपडले त्यांस ताडिलें तस्करांनीं. १.
आधींच गेला धाकें दडपून त्यांवरी पडती पाषाण
आधींच नवज्वरें गेला व्यापोन त्यांत विषपान पैं झालें. २.
आधींच गृहास लागला अग्न त्यावरी साह्य प्रभंजन[3]
कीं पुरीं जातां बुडोन गळां पाषाण बांधिला. ३.
व्याघ्रभयें पळतां उठाउठी तों रिसें[4] कंठीं घातली मिठी
तैशी कौसल्येस जाहली गोष्टी लल्लाट पिटी अवनीये[5]. ४.

**रामविजय.**

हितबोध दुर्योधन ऐकेना, त्यास विदुर म्हणालाः—

## ओव्या.

माझीं वचनें आतां कठिण परि पुढें गोड अमृताहून
औषध आधीं कडवट पूर्ण रोगहरण पुढें करी. १.
जैशी नाबद साखर मुखीं घालितां खडखडे फार
परि पुढें गोड अपार वचनें साचार माझीं तैशीं. २.
तुरट वाटे आमलक परि पुढें गोडी अधिक
माझीं वचनें दुःखमोचक न्यायनिष्ठ तैसींच. ३.
पिता पढवी पुत्रालागून त्यासि वाटे विषासमान
परि पुढें गोडी जाण महिमा पूर्ण वाढे तेणें. ४.

**श्रीधर.**

असें केवळ दृष्टांतांचेच नव्हे. तर, सर्व प्रकारच्या कथानकांत असेच सहस्रावधि चमत्कार आहेत. त्यांतले कोणते घ्यावे आणि

---

१ मोठा सर्प. २ विंचू. ३ वायु. ४ आस्वल. ५ पृथ्वीवर.

कोणते न घ्यावे, ह्याविषयीं मन गोंधळून जातें. तरी केवळ मासल्या-करितां त्यांतलीं कांहीं कांहीं प्रसंगांचीं पद्यें येथें सादर करितों. त्यांत कांहीं विशेष क्रम धरिला नाहीं. तरी, एकंदरींत, जगांतले सगळे व्यवहार उत्तम रीतीनें चालविण्यास माणसास चातुर्य आणि नीति हीं अतिशयित उपयोगीं पडतात. हीं दोन्हीं ज्यांत लाभतील अशीं पद्यें तुम्हांस अर्पण करितों. ह्यानें तुम्हांस महाराष्ट्र वाङ्मयाचें अवलोकन करण्याची लालसा उत्पन्न व्हावी एवढीच माझी इच्छा आहे.

पत्नीधर्मास आरंभ विवाह झाल्याबरोबर होत असतो. त्याच्या संबंधाचा उपदेश आपल्या वाङ्मयांत जितका उत्तम आहे, तितका उत्तम उपदेश दुसऱ्या कोणत्याही वाङ्मयांत सांपडावयाचा नाहीं, असें मला वाटतें. शकुंतला कण्वाची आज्ञा घेऊन दुष्यंताकडे जायास निघाली, तेव्हां, तेथें कसें वर्तावें ह्याविषयीं कण्वानें तिला बोध केला आहेः—

**श्लोक.**

शुश्रूषा पतिची करीं सवतिशीं स्नेहप्रवृत्ती धरीं
केलें यद्यपि अप्रिय स्वपतिनें कोपूं नको अंतरीं
राहीं सावध फार गर्व न धरीं दासीं करावी दया
येणें पावति थोर मान युवती[1] होती दुजा अप्रिया.

**परशुरामपंत गोडबोले.**

अशी वृत्ति पत्नीच्या ठायीं असल्यावर मग गृहसुखास काय कमी! आणि अशा स्त्रिया त्याच खऱ्या पतिव्रता होत.

आतां सामान्य पतिव्रतेचीं लक्षणें पाहाः—

---

१ स्त्रिया.

## ओव्या.

स्त्रियांसि साधन हेंचि थोर आपुला पति तोचि ईश्वर
सेवा करावी सादर दुजा विचार नसावा. १.
सकळांचे अन्याय सोसून दासदासींचें राखी मन
अवघीं निजल्या करी शयन सर्वां आधीं जागी होय. २.
दरिद्री हो वृद्ध भ्रतार दीर्घ रोगी दुःखें जर्जर
द्रव्य न जोडी क्रूर परि न कंटाळे पतिव्रता. ३.
सेवा करी घडी घडी म्हणे जितकी पडे तितकी थोडी
शरीरपोषणीं आवडी सर्वही सोडी सती ती. ४.
भ्रताराची प्रीति जे ठायीं तिचा स्नेह तिकडेचि वाही
पति द्वेषी सहसाही त्यातें प्रीति करीना. ५.
पतीचें मन रंजे जेणें तेंच बोले कौतुक वचनें
मनीं म्हणे अहेवपणें मी जाईन याआधीं. ६.

**श्रीधर.**

अशा प्रकारच्या ज्या पतिव्रता आमच्या पुराणांत वर्णिल्या आहेत, त्यांत द्रौपदीची गणना आहे. तिचें वर्णन आहेः—

## आर्या.

धर्म म्हणे "शकुने जी रूपें श्रीला क्षमागुणें महिला[1]
साजे सखी अखिन्ना कृत्यभरें सुमति आमुची महिला[2]. १.
शरदुत्पलपत्राक्षी[3] शरदुत्पलपुण्यगंधसमगंधा[4]
अस्खलित चालवी गृहधर्मीं मज यष्टि[5] जशि पथीं अंधा. २.
आधीं जिनें उठावें पाहुनि निजलों असें मग निजावें
रागेजणें[6] सुदुर्मिळ तेंहि जिचें ज्वालसें गगनिं जावें. ३.

१ पृथ्वी. २ स्त्री. ३ कमलनेत्री. ४ कमलांचा सुवास, तशी कीर्ति. ५ काठी. ६ रागावणें.

धौम्यापासुनि गोपांपर्यंत जिनें स्वयें समाचार
घ्यावा श्रितताप[1]हर श्रीगंगेचा जिचा समाचार[2]. ४.

**मोरोपंत.**

हें द्रौपदीचें वर्णन धर्मराजानें केलें आहे, तसें सीतेचें वर्णन रामचंद्रानें, विरहदुःखग्रस्त असतां केलें आहे.

**आर्या.**

हा सीते! तुजवांचुनि सर्वहि मज तापहेतु हा सीते!
हा सीते! तूंचि मज व्यसनसमुद्रांत सेतु हा सीते! १.
हा सीते! मज देतो त्वन्मुखजित चंद्र ताप हा सीते!
हा सीते! करितो द्विजराजहि म्हणवूनि पाप हा सीते. २.
हा सीते! हा सीते! असशिल अद्यापि तूं कशी सासू[3]
ऐकुनियां वार्तेतें प्रिय सखि वांचेल ती कशी सासू. ३.
हा सीते! हा सीते! हा सीते! सुंदति[4] मुदतिशय[5]सुखने
मुख नेत्रा दावुनि पर-लोकीं मज साध्वि द्यावया सुख ने. ४.

**मोरोपंत.**

देवाची साक्ष भक्तांविषयीं असावी, तशी ही भ्रतारांची साक्ष पत्न्यांविषयीं आहे. एवढें ह्यांच्या पातिव्रत्याविषयीं सांगणें पुरे आहे.

एकाच प्रसंगाचें वर्णन वेगळे वेगळे कवि वेगळ्या वेगळ्या प्रकारीं कसें करितात, ती एक मोठी मौज असते. नळाच्या पांच मूर्ति एकसारख्या दिसत असल्यामुळें स्वयंवराच्या वेळीं दमयंतीस खरा नळ ओळखितां येईना, तेव्हांचें वर्णन पंतांनीं असें केलें आहेः—

१ सेवकांचा त्रास हरणारा. २ चांगला आचार. ३ जीवंत. ४ दांत चांगले आहेत अशी. ५ आनंदाचे खाणी.

### आर्या.

पांचां नळांत जेव्हां काय दिसेनाचि भेद लव[1] तीस
बुद्धि म्हणे कां भीसी गुरुचरणीं त्यजुनि खेद लवतीस[2]. १.
कर जोडोनि म्हणे ती नळ भर्ता भीमकन्यकेला हो
प्रभुजी स्वप्नांतहि जरि संकल्प नसेल अन्य केला हो. २.
नळ पति इतर पुरुष पितृ बंधु जरि समान मानिले असती
तरि ताराल इला हो प्रभुजी कैसी तरेल जी असती[3]. ३.
तीचा बलवान् निश्चय सुरर्धृत[4] नळरूप घे हिराऊनी
बहु तेज प्रगट करी शुचि सत्वगुणच्छळीं हिरा ऊनीं. ४.
पतिरूप सोडवुनि ती लोकेशांचा प्रसाद साधूनी
घाली नळासि माळा स्तविली प्रेमप्रसन्न साधूंनीं. ५.

### वनपर्व.

शारदेनें दमयंतीस पांचां नळांचें वर्णन ऐकवून, खऱ्या नळाचे ठायीं त्या चौघांचे गुण आहेत, असें फार मार्मिक रीतीनें दर्शविलें, त्याचें आणि विवाहाचें वर्णनः—

### श्लोक.

ज्याचीं पदें धरिति देव शिरोललामीं[5]
स्वाराज्य[6] जो मिरवितो गजराजगामी[7]
जो वज्रपाणि[8] बहुलोचन[9] कांति भारी
हो[10] पाहिजे तरि वरीं नळरूपधारी. १.
साहील कोण सजणें बहु तेज याचें
मध्यस्थ[11] रूप धरितो हरिचे यमाचे

---

१ अल्प. २ नम्र होणारीस. ३ वाईट स्त्री. ४ देवांनीं घेतलेलें. ५ शिरोभूषण. ६ स्वर्गराज्य. ७ गजगति. ८ हातीं वज्र आहे ज्याचा तें. ९ पुष्कळ डोळे. १० इंद्र. ११ पूर्व आणि दक्षिण ह्यांच्या मधली दिशा आग्नेयी, तिचा स्वामी अग्नि.

स्नेहा धरी अधिक होय तमासि वारी
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी. २.

संपूर्ण ते समज यासम दक्षिणाशा
पाप्यांस दंड धरितो करितो विनाशा
देहीं जया मिरविते घन[1]कांति भारी
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी. ३.

आधार हाचि सजणे बहु जीवनाचा
रक्षी दयेंकरुनि मान ऋषीजनांचा
यादां[2]सें फार म्हणती जन सौख्यकारी
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी. ४.

होतील नंदन[3]विलास जयास तो हा
आहे धनंजय[4]हि धर्महि जाणतो हा
रत्ना[5]करीं तुज विराजविता विहारी
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी. ५.

शारदेस मग राजसुता हे शारदेंदुवदना वदताहे
शेवटील नळ हा मज बाई मानला बहु मनीं सुखदाई. ६.

## ओव्या.

तेव्हां दमयंती सुंदरी इंद्रादिकां नमस्कारी
तयां बोलली उत्तरीं अमृतापरिस मधुर. १.

माझा भीम जैसा पिता तैसे तुम्ही जी तत्त्वतां
करा कन्यादान आतां नळनाथाचिये करीं. २.

---

१ काळा रंग—यम. २ जलचरांस—वरुण. ३ इंद्राचे. ४ धनवान् असा. ५ समुद्रांत-पहिल्या चारी नळांचे गुण, पर्यायेंकरून, एका पांचव्यात आहेत, असें दर्शविलें आहे.

### श्लोक.

सुर समस्त इच्या वरनिश्चयें
सुरस मस्त असें वदले स्वयें
नळ वरासि वरोनि सुखी असें
तुज नको जन कोण म्हणे असें. १.

रघुनाथपंडित.

द्यूत आटोपल्यावर दुर्योधनानें द्रौपदीस सभेस आणण्याकरितां सूतपुत्र पाठविला. त्याचें बोलणें ऐकून द्रौपदी त्याशीं बोलली, त्याचें वर्णन आहेः—

### ओव्या.

मग द्रौपदी म्हणे तयासी जाओनि सांगें भीष्मद्रोणांसी
तुम्ही श्रेष्ठ असतां सभेसी विपरीत करणी काय हे. १.
धर्में हारविलें आपणास तरी तो तुमचा झाला निःशेष
धर्मासि आणि आम्हांस मग संबंध कायसा. २.
मी पांच पुरुषांची ललना पाहीं मज सर्वथा जिंकिलें नाहीं
नारदें नेमिले दिन सर्वही सीमा केली अलोट. ३.
पांचां ठायीं वांटिलें वर्ष दोन मास द्वादश दिवस
त्यांत मी स्त्री भीमाची निःशेष तरी धर्म केवीं हारवी. ४.

श्रीधर.

ह्याचेंच वर्णन मुक्तेश्वरांनीं केलें आहे, तें असेंः—

### ओव्या.

म्हणे ऐकें सारथिपुत्रा रजस्वला मी एकवस्त्रा
सभानायकां पवित्रां भीष्म द्रोणां जाणवीं. १.
सभेसि नेणें हें अनुचित म्यांही येऊं नये तेथ
वडील सुहृद सर्व आप्त असतां ऐसें होऊं नये. २.

आणीक एक असे भावो  आधीं जिंकोनि धर्मरावो
मग टाकिला माझा डावो  तोही प्रमाण दिसेना. ३.
पांचां जणांची मी जाया  पांचांजणीं हारविली काया
तरी संबंध बोलणें वायां  पतिव्रता म्हणोनी. ४.

सभापर्व.

म्हणजे धर्मराजानें मला हारविलें, तरी तें नीतिपूत नाहीं—योग्य प्रकारें—कायदेशीर रीतीनें झालेलें—नाहीं, असा तिच्या बोलण्याचा भावार्थ दिसतो. त्यांत चातुर्य आहे.

द्रौपदीवस्त्रहरणाचें वर्णन चार कवींनीं केलेलें येथें आतां देतों. त्यावरून, कवींच्या वर्णनाच्या पद्धतींत, कालभेदेंकरून कल्पनांचा आणि शब्दांचा कसा फरक पडत जातो, हें तुमच्या लक्षांत येईल. ह्या वर्णनरचनेवरून हें सहज दिसून येईल कीं, कवि जितका जितका प्राचीन असतो, तितकें तितकें त्याच्या वाणीमध्यें गंभीरत्व, प्रौढत्व, आणि विशदत्व हें अधिक अधिक असतें. प्रथम मुक्तेश्वरांचें पहाः—

ओंव्या.

पंचकेशर पांजणीचें सुवर्ण केतकी दळ रंगाचें
तमालरस दल वर्णाचें पंच पदरांचीं पाडलीं. १.
चित्रवन खुली कुडलिया कारले कल्हारे चौकडिया
भरित साडी चुनडिया नवसा सुकुसुंबी. २.
मुगी पोफळी रावळें सेवती बोजसणी सीडवळें
निकोप तापेचीं पातळें अति मवाळें शोभती. ३.
बोटधारिया दुधारे त्रिमिर दुतारे शेलारें
कळती सुत दहातरे वैरागाराचीं वरी तोडें. ४.
गंगासागरी चंद्रकळा तेजें लोपवी सुवर्णकमळा
नवविध रत्नांचीया कीळा तकतका सुवस्त्रीं. ५.

तैलंग त्रिगुण मल्याणीचीं सिहॆल कोशल वैदर्भीचीं
गौड गुर्जर बंगालचीं बहु वर्णांचीं साडलीं. ६.

ह्यांतल्या कितीएक शब्दांचे अर्थ सध्यां मुळीं कोठेंच कळत नाहींत.

मोरोपंतांचें म्हणणें:—

### आर्या.

परमेश्वर रूप धरी स्वपरजनहितोदया लुगडियांचें
लिववाया सभ्यांसह मन नयनहि तो दयाळु गडियांचें. १.
हा अंबरावतार श्रितलज्जारक्षणार्थ अकरावा
प्रभु मत असे सदवनीं आग्रह वेषीं कदापि न करावा. २.
शेले शालू साड्या क्षीरोदक लांबरुंद पाटावें
झाला अनंत वस्त्रें कीं तीस अनाथसें न वाटावें. ३.

श्रीधरांची वाणी:—

### ओव्या.

पाटाव ओढी जरतारी कोल्हारवर्ण त्या अंतरीं
जरीचे शिखी मराळ पदरीं तेंही आंवरी वेगें तो. १.
काशी काची अवंतीचीं अयोध्या मथुरा मायापुरीचीं
वसनें आणिलीं द्वारकेचीं भगिनीलागीं श्रीधरें. २.
अंगवंग दशार्ण कलिंग कुलिंद काश्मीर भोज सुरंग
सौवीर सौराष्ट्र श्रीरंग वसनें सवेग आणविलीं. ३.
बंगाल मागध मालव नेपाळ केरळ चौल पांचाळ
गोंड मल्याळ स्त्रीराष्ट्र सिंहल द्रविड कर्नाटक आंध्र पैं. ४.
करहाटक महाराष्ट्र धोरण घोटनाट पंजाब पुलिंदहूण
भिल्ल गांधार विदेह चैद्य जाण विदर्भ विन्हल केरळ. ५.
चीन मुलतान लाहोर काबूल बैंगपूर फिरंगण थोर
खुरासन आणि कृष्णवस्त्र वस्त्रें तेथिचीं अपार पैं. ६.

ह्यांत आढळतात, त्या कांहीं कांहीं नांवांचे प्रांत कोठें होते, हेंही कळण्यास मार्ग नाहीं.

हेंच अमृतरायांनीं असें गाइलें आहेः—

### कटाव.

निर्भय जाली मनिं पांचाळी, आला कैवारी वनमाळी, हर्षें सज्जन वाहाति टाळी, जालें अति कौतुक ते काळीं, दुर्योधनसंकेतें लवकरि, दुःशासन करिं, आसुडितां निरि, निघती वसनें दिव्य परोपरि, क्षीरोदक जरतारी बारिक, कळस पाकरा धावळि गुजरी, सोनसळी चंद्रकळा चवडी, गंगासागर लिंगाची, बहु मुगि दुरंगि भिंगाची, किति चिंच पान शेलार कलंदर, बोटधार नामावळि तगटी, ताडपत्र मोतेचुरि पातळ, कपिल कल्हाईत माजबंदि पाटाव दुतारी, राजमहाल खाखा फुटाणी, राजा वळकर कोट परकळे, गगन महाल पाचेची बारीक, रुद्रगांठ चिंचोरी फुलकडी, खंबाइत सुरपाल घटेची, वरि माणिक चंद्रिका कशीदी, कुसुंबी चिकदोजी कुरळे, चिरीवन खुले, झुणे तपशिले, रंगित शेले, बनसकटारे पहा देडोरवे, तिसे रासते, जाळि पडवळी, चुनडी पोंवळि, तडकसोवळी, शेवंती साडी, खडी खसखसी, तिघडि रुमाली बिंबबादली, खिचडि गुलाली, छिटें बंदरी, संगमनेरी, रंग किनारी, हंस धवल सुख माणिक सुधार, कोकिल जास्वन जांबूअतशी, इंद्रगोप काश्मीर केतकी, किंशुक चंपक जात दाडिमी, सुमनसाजरी, भडक भरजरी, बहुत बहुपरी, प्रसाद वसनें परमसोजळें, भरित परिमळें, येकाहुनी पट एक अधिक मनिं, तवक धरुनि दुःशासन वोढिता दोहिं करें थकला मग, चांचपडे उघडे न पडे नख, लाजविले रिपु, भागविली गौरविली हरिनें, भगिनिसि दाखविली, अति अद्भुत लौकिक करणी.

अशीं अनेक कवींचीं एकाच प्रसंगाचीं आपल्या पुराणांतलीं अनेक प्रकारचीं वर्णनें वाचलीं म्हणजे भाषेचा, रचनेचा आणि शब्दांचा चमत्कार वाटून असें मनांत येतें कीं, पुराणांतलें कांहींएक

विशेष कथानक आपल्या आवडीप्रमाणें निवडावें, आणि त्याचें वर्णन, मुख्य कथाभाग कायम ठेवून, आपापल्या काळच्या परिस्थितीप्रमाणें करावें, असा कविजनांचा पाठच आहे. पांडवांचा कालही अद्याप निर्णीत झाला नाहीं, तेव्हां, ह्या वस्त्रहरणाच्या वेळीं तेथें मुक्तेश्वर, श्रीधर, मोरोपंत आणि अमृतराय ह्यांतला एकही कवि नव्हता, आणि खुरासान, मुलतान इत्यादि प्रदेश त्या नांवांनीं प्रसिद्ध नव्हते, हें उघड आहे. तरी, वस्त्रहरण दृष्टीसमोर ठेवून, कवींनीं आपापल्या कल्पनेप्रमाणें त्या गोष्टीचें चित्र शब्दांत वठविलें आहे. अमृतरायांच्या कटावांत "संगमनेरी" हा शब्द आहे. ह्याप्रमाणें, सांप्रत काळीं जर तसा एकादा कवि ह्या प्रसंगाचें वर्णन करूं लागला, तर, त्याच्या कवनांत लंडनी, मांचेस्तरी, ब्रिस्तली, जपानी, जर्मनी, अमेरिकी, टोकिओई, पीटर्सबर्गी, इत्यादि शब्द सहज येणार आहेत. काळदेश-वर्तमानाचा परिणाम काव्यावर होत असतो, तो हा असा आहे. आणि ह्यावरून हें लक्षांत ठेवायाचें आहे कीं, काव्यांचा मुख्य हेतु मनोरंजन आणि धर्मनीतिबोध, हा असतो, भूगोलविद्या किंवा खगोलविद्या किंवा रसायनशास्त्र शिकविण्याचा नसतो. म्हणून कवींच्या कल्पनांस, वर्णनाच्या साहित्याच्या प्रदेशांत, पाहिजे तिकडे आणि पाहिजेत तशा भराऱ्या मारायास सांपडतात. हा त्यांस एक प्रकारचा अधिकारच आहे. अर्थाच्या विशदत्वाकरितां अलंकार योजण्याचा परिपाठ जसा शुद्ध मानिला आहे, तसा वर्णनाचें साहित्य पाहिजे तेथून घेण्याचा प्रघात निर्दोष मानिला आहे. ह्यावरूनच "नहि देखे रवी तो देखे कवि" अशी म्हण पडली आहे.

काळकौशिक हा ब्राह्मण हरिश्चंद्र राजापासून तारामतीस विकत घेऊन चालला, त्या प्रसंगाचें वर्णनः—

## ओव्या.

तो परमपवित्र श्रोत्री सदाचारी अग्निहोत्री
धर्मशाळे अन्नसत्रीं पाकालागीं घेतसे. १.
पवित्र तारामतीचें तुक तुळोनि दिधलें शुद्ध कनक
राजांगनेसी काळकौशिक घेऊनि जातां आश्रमा. २.
रोहिदास म्हणे जी ताता मातृस्नेहें कळवळ चित्ता
भेटोनि येईन मागुता वेळ न लागतां क्षणमात्रें. ३.
राजा म्हणे सद्‌गद वचनें भेटोनि मागुती शीघ्र येणें
मातृपाठीं धांवतां तेणें आलें देखे बाळक. ४.
उभी राहोनि वेल्हाळा पोटेंशीं कवळोनि बाळा
स्तन घालोनि मुखकमळा कुरवाळोनि बुझावी. ५.
म्हणे बाळका कुळभूषणा तुझा वियोग न साहवे प्राणा
परी तापसदक्षिणेचिया ऋणा नेंदू कैशी तुजवीण. ६.
आंसवें भरोनियां नयन हाहाशब्दें करी रुदन
परतापक्लेशें सज्जन नवनीत तैसे वितळती. ७.
राज्ञी ऋषीचे पादपद्मीं नमूनि म्हणे तातस्वामी
माझें बाळक घ्यावें तुम्हीं सेवा करील चरणाची. ८.

मुक्तेश्वर.

ह्याचेंच वर्णन पांडवप्रतापांत असें आहेः—

## ओव्या.

तेणें तत्काळ सुवर्णराशी केली विश्वामित्रापाशीं
हातीं धरिलें तारामतीसी चाल घरासी म्हणोनी. १.
विप्रें तारामती नेली ते क्षणीं रोहिदासाकडे पाहोनी
अश्रु आले राजाचे नयनीं अधोवदनें स्फुंदत. २.
तारामती परतोन पाहे रायाचें वदन
हे आतां दुर्लभ चरण अंतरले कीं मजलागीं. ३.

बाळ म्हणे हरिश्चंद्रालागून मी पाहीन मातेचें वदन
येरू म्हणे बा रे संपूर्ण तुटला जाण ऋणानुबंध. ४.
मग बाळ धांवला लवलाहें मातेस म्हणे उभी राहें
मज सोडूनि जननीये कोठें जातेस सांग पां. ५.
स्तन घातला वदनकमळीं करें मुख त्याचें कुरवाळी
ब्राह्मणास म्हणे ते वेळीं बापा एक ऐकावें. ६.
याचें कायतें द्रव्य देईं तेवढें बाळ विकत घेईं
म्हणोनि लागली पायीं काळकौशिकाचे तेधवां. ७.
वत्स आणि गाई मेळवावी एके ठायीं
कुरंगिणी पाडसा पाहीं विघड न करीं महाराजा. ८.

**श्रीधर.**

ह्याच अनर्थाचें वर्णन पंतांनीं केलें आहेः—

## आर्या.

मोठ्यानें भूप म्हणे पुरजनहो वचन आयका माजें[1]
कोण असें पुसतां तरि पुशिंजे येईल काय कामा जें. १.
स्पष्ट नृशंस[2] अमानुष[3] राक्षस त्याहून पापतर[4] आहें
स्त्रीतें धनार्थ विकितों जो मी न मरें हिताहित न पाहें. २.
ज्या कोणाला दासी व्हावी कार्यें करावया गेहीं[5]
तो येउनि घेवो हे जोंवरि आहेत मदसु[6] या देहीं. ३.
ऐसें ऐकुनि आला वृद्ध ब्राह्मण म्हणे गृहीं कार्या
न शके करावया बहु सुकुमारी मम मनःप्रिया भार्या. ४.
व्हावी मज दासी हे देइं धन उदंड दे करी सवदा
हर हर दुष्कर तो स्त्रीविक्रय असुविक्रयापरीस वदा. ५.

---

१ माझें. २ दुष्ट. ३ माणूस नव्हे असा. ४ अधिक पापी. ५ घरीं. ६ माझे जीव.

मग चाल चाल म्हणतां सोडुनि पतिपुत्र न निघतां क्षिप्र[1]
केश धरुनि राज्ञीतें स्वगृहा ओढीत चालवी विप्र. ६.
विप्र ओढुनि नेतां शिशु शोकें म्हणुनि अंबअंब[2] रडे
झोंबे वस्त्रासि मनीं फोडी ती मायगाय हंबरडे. ७.
द्विज केश धरुनि ओढी ओढी तो शिशुहि वस्त्र कवळून
खवळून पदें हाणी विप्र परि नव्हेचि दूर जवळून. ८.
द्विज तो त्याहि शिशूचें[3] जें झालें मूल्य धर्मशास्त्रमतें
बांधोनि नृपतिला दे घेऊनि तदुत्तरीय[4] वल्कल तें. ९.

हरिश्चंद्राख्यान.

हें वर्णनसादृश्य तर आहेच. पण ह्यांत राजानें ब्राह्मणास जें म्हटलें आहे कीं, माझ्या देहांत जीव आहे तोपर्यंत ही तुमची दासी आहे, त्यांत मुख्यार्थ असा गर्भित केला आहे कीं, मी जीवंत आहें, तोंपर्यंत मात्र माझी सत्ता इजवर आहे, मी मेल्यावर ती माझी कोणी नाहीं, आणि तुमचीही कोणी नाहीं. हा विचार फार लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

आतां थोडे वर्णनपर वेंचे देतों. त्याचें तात्पर्य तुम्हांस सहज कळण्यासारखें आहे. म्हणून तें जागोजाग दिलें नाहीं.

आपलें वाङ्मय असें आहे कीं, व्यवहारबोधाच्या संबंधानें अमकें एक त्यांत नाहीं, असें कांहीं सांपडावयाचें नाहीं. एका पुरुषास अनेक पत्न्या असणें ह्यांत कांहीं फारसें विशेष नाहीं. परंतु, एका स्त्रीस अनेक भ्रतार असणें आणि त्यांचें नांदणें पवित्रपणें उत्तम प्रकारें शेवटास जाणें, ह्याचेंही उदाहरण भारतांत पांडवांचें आहे. आणि हें व्रत तरवारीच्या धारेसारखें कठिण, असें

---

१ लवकर. २ आई, आई. ३ मुलाचें. ४ त्याचा पदर.

तेव्हांही मोठमोठ्यांस वाटत होतें. एके समयीं सत्यभामा आणि द्रौपदी ह्यांचा संवाद ह्याविषयीं झाला, त्याचें वर्णन पंतांनीं केलें आहे:—

आर्या.

भामाकृष्णा गंगायमुनाशा भेटल्या अनादि सत्या
साक्षात् लक्ष्मी गौरी ऐशा झाल्याचि त्या जना दिसत्या. १.
सत्या कृष्णेसि म्हणे "वदत्यें तें तूं खरेंच मान सये[1]
लोक म्हणोत परि पळहि माझ्या हातीं न कांतमानस[2] ये. २.
त्वां हे पांच पति कसे वश केले भजति[3] सर्व एकीतें
थोडें याहुनि पाहुनि नटती कादंबिनीस[4] केकी[5] तें. ३.
सांग वशीकरण[6] कसें केलें त्वां देवि कोणत्या मंत्रें
कीं दिव्यौषधिमूळें[7] किंवा वात्स्यायनोदितें[8] यंत्रें." ४.
कृष्णा हांसोनि म्हणे "भामे मोहावयासि पतिला जे
मंत्राद्युपाय[9] करणें या श्रवणें बहु मंदीय[10] मति लाजे. ५.
प्रेमें पतिचरणासि न देउनि दे हात ताइतीला[11] जे
ते स्त्री न रुचे पतिला कीं तीतें आततायिता[12] लाजे. ६.
पति-परमेश्वरचरणा जी तत्सेवार्थ न नवशी[13] करणें
ती मुग्धा कैसी गे वळवील स्वामिमन वशीकरणें. ७.
जाणें वशीकरण हें करित्यें जेणें कधीं न कोपति तें
सखि तूंहि असेंचि करीं मदमत्सर दाखवूं नको पतितें. ८.
पतिचे प्रसाद देती ज्या सद्गतितें न योगसेंव[14] तीतें
वाहे पहा शिरीं शिवदेहार्धमता शिवा[15] स्वसवतीतें[16]." ९.

वनपर्व.

---

१ सख्ये. २ नवऱ्याचें मन. ३ प्रीति करिती. ४ मेघसमुदायास. ५ मोर. ६ मोहणें. ७ जादूच्या वनस्पतीनें. ८ वात्स्यायन ऋषीनें सांगितलेल्या. ९ मंत्र इत्यादि उपाय. १० माझी. ११ भारलेली ताईत. १२ घातकीपणा. १३ नवस. १४ यज्ञ. १५ महादेवाची पार्वती. १६ सवतीला.

विदुला ही सौवीर देशाच्या राजाची पत्नी होती. तिचा पति मरण पावल्यामुळें आणि पुत्र संजय अल्पवयस्क असल्यामुळें सिंधुदेशाच्या राजानें त्याचा पराभव करून त्याचें राज्य घेतलें. पुढें संजय प्रौढ झाल्यावर तिनें त्यास क्षात्रधर्माचा उपदेश केला. त्यानें संजयाला वीरश्रीचें स्फुरण चढून तो सिंधुराजाशीं लढूं लागला. त्या प्रसंगीं तो माघार घेऊन परत आलेला पाहून ती त्याला जें बोलली, त्याचें वर्णनः—

## आर्या.

विदुला ह्मणे अहा रे क्लीबा[1] मंदा कसा पळालास?  
कां वांचलासि? अयशस्कर ऐसा तूं न कां गळालास? १.  
अरि हरिल राज्य मग तूं वरिशिल वृत्त्यर्थं[2] काय माधुकरी  
सुखकर सुकर्म टाकुनि, असुखकर कुकर्म कोण साधु करी. २.  
मद्यौवन[3] संजय! हें निजनामहि[4] बुडविलें तुवां दगडें  
झगडें यशोर्थं[5] अरिरथचक्रांहीं स्पष्ट लोष्टसा[6] रगडें. ३.  
जेणें लज्जित व्हावें स्वर्गीं सहपूर्वजें तुझ्या तातें  
परमानुचित पलायन कैसें केलें तुवां कुजाता तें. ४.  
मरण विहित[7] न पलायन भीती धर्मज्ञ-राजकन्या[8] या  
अन्या याहुनि अधिका घडल्याही न गणतीच अन्याया. ५.  
साधूसि बाहुजाचा[9] मत[10] विजय जसा तसाचि वध मत रे  
निजधर्माश्रित[11] न बुडे निजधर्मच्युत[12] कधीं न अधम तरे. ६.  
अधमा तुवां मरावें, क्षणहि न, बुडवूनि मान[13] वांचावें  
कौंळा[14]! यासम अन्यहि जे असतिल त्यांहि मानवां चावें. ७.

---

१ नपुंसका. २ उपजीविकेकरितां. ३ माझें तारुण्य. ४ आपला लौकिकही. ५ यशाकरितां. ६ ढेंकूळसा. ७ योग्य. ८ क्षत्रियधर्म जाणणाऱ्या राजकन्या. ९ क्षत्रियाचा. १० मान्य. ११ आपल्या धर्मानें चालणारा. १२ स्वधर्मभ्रष्ट. १३ अभिमान. १४ हे मृत्यो!

तिला त्यानें उत्तर दिलें त्याचें वर्णनः—

## आर्या.

तो संजय तीस ह्मणे 'पुत्राच्या इच्छितीस कां मरणा
वांच्छिति[1] शमों[2] अकाम[3] प्राज्ञ[4], इतर इच्छिती सकाम रणा. १.
रडसील सस्नुषा[5] कीं जरि मज देइल परासुता[6] समर
न म्हणेल स्वप्नींही शतपुत्राही[7] परा[8] सुतास मर. २.

त्यावर तिचें म्हणणें:—

## आर्या.

जी व्यर्थ उभयलोकांनुपयुक्त[9] अपत्य वाढवी तीतें
स्पष्ट करी वात्सल्य[10], ज्ञातेजन म्हणति गाढवी तीतें. १.
निजलाशि काय उठ रे! जय पावतसे सदा समरशील[11]
उत्साह टाकितां तूं दैन्यें[12] सांगने[13] सदास[14] मरशील. २.

संजयाचें उत्तरः—

## आर्या.

संजय म्हणे 'नमस्ते[15] जननि! जन निशाकरें[16] जसा निवतो
बोधें तसा निवालों न हितकर[17] गुरूपदेशसा[18] शिव तो. १.

**मोरोपंत.**

ह्यावरून आमच्यांत वीरमाता कशा होऊन गेल्या, ह्याचें दिग्दर्शन होतें.

---

१ इच्छिती. २ शांति. ३ निष्काम. ४ शहाणे लोक. ५ सुनेसह. ६ मरण. ७ जिला शंभर पुत्र आहेत ती देखील. ८ परकीय. ९ उभयलोकीं उपयोगीं न पडणारें. १० दया. ११ युद्ध करणें ज्याचा स्वभाव तो. १२ दारिद्र्यानें. १३. स्त्रीसह. १४ दासासह. १५ हे आई! तुला नमस्कार असो. १६ चंद्रानें. १७ कल्याणकर. १८ गुरुबोधासारिखा.

वनवासांत द्रौपदीचें आणि कृष्णाचें भाषण झालें त्याचें वर्णनः—

## आर्या.

श्रीकृष्णा[1] श्रीकृष्णा[2] दावुनि खलपाणिकृष्ट[3] केश वदे
उक्तिकडे[4] मन दे परि नयन तदास्याकडे[5] न केशव दे. १.
"हे केश धरुनि ओढुनि नेलें दुःशासनें सभेस सख्या
तेव्हां मज आठवली त्वत्पदयुगुली[6] सखी, न अन्य सख्या[7]. २.
ईणेंचि राखिली बा लज्जा उघडी पडों दिली न सती
यदुकुलकीर्ति न उरती जरि मज हे ठाउकी किली नसती. ३.
होते समीप पांचहि पति अतिमति[9] हे मनें उदासीनें
म्यां व्यसन साहिलें तें न असेल विलोकिलें कुदासीनें. ४.
सोडी पुनःपुन्हा खळ न धरुनि लज्जा दया भया लुगड्या
उघडें पडतें वपु तरि तूं अंतरतासि बा दयालु गड्या. ५.
यांचीं शस्त्रें अस्त्रें दोर्दंडबळें[10] खळें वृथा केलीं
धिक्कष्टम्[11] सर्व यशें सुज्ञानें एकदा लया गेलीं." ६.
ऐसें वदोन रडतां, कृष्ण म्हणे "अंब[12] ! तूं नकोचि रडों
कळवळतें मन्मन सखि या शोकाचळभरें[13] नको चिरडों. ७.
सखि अखिलसतीपूज्ये[14] मद्धैर्य तवाश्रुबिंदुसह गळतें
केवळ तुझेंचि न वदन अमृतद्युतिगौर[15] मद्यशहि[16] मळतें. ८.
तुज गांजिलें जिहीं[17] त्यां ज्यांत यशोनाश[18] अंगनाश[19] तशा
वरितील[20] दशा त्यांच्या शोकें रडतील अंगना[21] शतशा. ९.

---

१. द्रौपदी. २ कृष्णाला. ३ दुष्टाच्या हातांनीं ओढलेले. ४ बोलण्याकडे. ५ तिच्या मुखाकडे. ६ तुझें पदद्वय. ७ मैत्रिणी. ८ युक्ति. ९ बुद्धिमान्. १० भुजदंडबळें. ११ हाय हाय. १२ आई. १३ शोकपर्वताच्या ओझ्यानें. १४. सगळ्या चांगल्या स्त्रियांनीं पूजिलेली. १५ चंद्रतेजासारखें स्वच्छ. १६ माझा लौकिकही. १७ ज्यांनीं. १८ कीर्तीचा नाश. १९ शरीराचा नाश. २० प्राप्त होतील. २१ बायका.

असती अशीच धर्मी चित्तीं माझा धरोनि बोल[1] टिकें
झालें कधींच न मृषा[2] होईल मदुक्त काय हो लटिकें. १०.
होइल मद्वचन[3] मृषा केव्हां तरि वारिराशि[4] आटेल
ग्रहगण[5] गळेल हिमगिरिराज खचेल क्षिती[6]हि फाटेल." ११.

## वनपर्व.

काम्यकवनीं पांडव राहात असतां, त्यांस आपलें राज्यवैभव दाखवून लाजविण्याकरितां, दुर्योधन आपल्या मंडळीसहवर्तमान तेथें गेला असतां, त्यालाच चित्रसेनगंधर्व बद्ध करून घेऊन चालला, हें वर्तमान दुर्योधनाच्या सेवकांनीं धर्मास कळविलें, तेव्हां, तो भीमार्जुनांस म्हणालाः—

### ओव्या.

आम्ही पांच ते एक शत मिळोनि बंधु समस्त
त्यांस गंधर्व धरून नेत पाहावें विपरीत कैसें हें. १.
तरी तुम्ही लवकर धांवा शत्रु उपकार करून रक्षावा
यशध्वज उभारावा कौरवांसी सोडवुनी. २.

**श्रीधर.**

ह्या प्रसंगाचें वर्णन पंतांनीं केलें आहेः—

### आर्या.

भीम म्हणे "खळमत[7] हें आम्हां श्री दाखवूनि गांजावें[8]
त्या हितकरसुहृदांसीं[9] आम्हीं भांडावयासि कां जावें." १.
धर्म म्हणे "रे भीमा शरणागत रिपुहि रक्ष्य[10] सन्महित[11].
जा जरि घडेल भीताभयदानें[12] जगीं तरीच जन्महितें[13]. २.

---

१ शब्द. २ खोटा. ३ माझा शब्द. ४ समुद्र. ५ तारासमूह. ६ पृथ्वी. ७ दुष्टांचा हेतु. ८ त्रासवावें. ९ आमचें हित करणारें गंधर्व. १० रक्षण्यास योग्य ११. साधूंस पूज्य. १२ भ्यालेल्याला अभय देणें. १३ जन्मसार्थक.

न सहावा अन्यकृत[1] ज्ञातिपराभव[2] बुधें[3] उठा रचितो[4]
जन्मुनि सुयशासि[5] न जो जननीयौवनवनीं[6] कुठारचि[7] तो." ३.

भद्रायु हा एक राजपुत्र होता. त्याची माता सुमती. हिच्या विनंतीस मान देऊन ऋषभ ह्या ऋषीनें त्याला बोध केला. तो सर्वांस ग्राह्य आहे:—

## आर्या.

वत्सा ! शाश्वत होय श्रुतितज्ज्ञपुराणकथित[8] जो धर्म
तो सेव्य उभय लोकीं प्राणी तेणेंचि पावतो शर्म[9]. १.

भज सन्मार्गीतें तूं दैवज्ञांची[10] करूं नको गर्हा[11]
स्वप्नांत देवहेलन[12] न करावें रीति हे तुला अर्हा[13]. २.

त्वां सत्य न त्यजावें मानावें प्राणसंकटहि फोल[14]
गोब्राह्मण रक्षाया वत्सा केव्हां असत्यही बोल. ३.

जी सत्कथा सदागम[15] सद्व्रत सद्धर्म जें सदाचरण
बा त्याची तृष्णा धर भावें स्मर शंभुचे सदा चरण. ४.

गोविप्रातिथिपूजन स्वाध्याय[16] स्नान होम मंत्र जप
पितृतर्पण देवार्चन यांतें तूं आळस त्यजोनि जप. ५.

बा कोप लोभ शठता[17] असदाग्रह[18] पिशुनता[19] कुटिल[20] भाव
उद्वेग[21] दंभ[22] यलें सोडीं जोडीं महाजनीं ठाव[23]. ६.

हें न तुवां विसरावें स्त्रीमृगयाद्यूतपान[24] यांत सदा
अत्यासक्ति[25] नसावी स्त्रीजित[26] अविनीत[27] जे नशांत कदा. ७.

---

१ परक्यांनीं केलेला. २ जातीचा पराभव. ३ शाहाण्यानें. ४ करितो. ५ सत्कीर्ति. ६ मातेचें तरुणपण हें वन झाला. ७ कुऱ्हाड. ८ वेद, वेद जाणणारे आणि पुराणें ह्यांनीं सांगितलेला. ९ कल्याण. १० ज्योतिषाची. ११ निंदा. १२ देवाची निंदा. १३ योग्य. १४ तुच्छ. १५ सत्शास्त्र. १६ अभ्यास. १७ लबाडी. १८ दुराग्रह. १९ नीचपणा. २० वांकडेपणा. २१ खिन्नता. २२ ढोंग. २३ स्थान. २४ स्त्री, शिकार, जुगार व मद्यपान. २५ फार प्रीति. २६ स्त्रीलंपट. २७ उद्धट.

सुखसंपन्नीं[1] मैत्री नित्य दया दुःखितीं जनींहि करीं
संतोष पुण्यवंतीं बा औदासीन्य[2] दुर्मती न धरीं. ८.
अतिपूर्व[3] अतिक्रोध श्रमनिद्राहारभाषणक्रीडा
हे षट्पदार्थ वर्ज्य होइल यांतें न वर्जितां पीडा. ९.
विद्योत्साह श्रद्धा स्मृति पुण्य ख्याति धैर्य हे आधीं
अनघा[4] मन घालुनियां अतिपूर्वक[5] षट्पदार्थ हे साधीं. १०.
नास्तिक धूर्त पतित शठ षंढ कितव चपल खल जड क्रूर
निजकल्याणाकरितां वत्सा सोडून यांस दे दूर. ११.
जननी जनक सती स्त्री गुरु सज्जन यांचिया वचा[6] साधो
विश्वासपदाहि धरीं न अविश्वासें तुला व्यथा बाधो. १२.
सावध सदा असावें संसारीं स्वहित काय लक्षावें
पुरुषार्थांचें साधन बा धनसें हें शरीर रक्षावें. १३.
बा पात्र अपात्र असो नीच महत्तम कसाहि हो पावें
जो याचना करील स्वशिरहि ईर्षें तयासि ओपावें[7]. १४.
यानें कीर्तिच जोडीं बा होय पदार्थ हाचि बहु धन्य
राजे पंडित यांचें भूषण नाहींच कीर्तिहुनि अन्य. १५.
आयुष्य कीर्ति यश बल पुण्य द्रव्य प्रजोन्नति प्राज्य[8]
तेणें तें कर्म करीं धर्मन्यायेंचि चालतें राज्य. १६.
आंवर निद्रे सत्वर अशनीं हो शिवयशोमृतें बा धा[9]
कोणालाहि न पीडीं शीघ्र पराची स्वयें हरीं बाधा. १७.

---

१ सुखी माणूस. २ परकेपणा. ३ अति हें विशेषण श्रमनिद्राहारभाषण-क्रीडा ह्या पदाचें. म्हणजे अति हा शब्द पूर्वीं लाविला म्हणजे अति श्रम, अति निद्रा, अति आहार, अति भाषण, आणि अति क्रीडा असे पांच शब्द होतात, आणि अतिक्रोध हा सहावा आहेच; मिळून. ४ पवित्रा. ५ अति हें पद विद्योत्साह, श्रद्धा, स्मृति, पुण्य, ख्याति आणि धैर्य ह्यांच्या पूर्वीं लावावयाचें. ६ भाषण. ७ द्यावें. ८ पुष्कळ. ९ तृप्त हो.

बव्हर्थ[1] जनमनोहर[2] स्वल्पाक्षर[3] मधुर सत्य बोलावें
ज्या सद्वाक्यश्रवणें श्रोत्यांचें चित्त शिरहि डोलावें. १८.

मोरोपंत.

विश्वामित्राच्या आश्रमाचें वर्णनः—

ओव्या.

वनश्री वर्णावी कवणें उपमे नंदनवन[4] उणें
नाना वृक्षीं फळें सुमनें सरसुवासें[5] दाटलीं. १.
एक सरळ शाखाविहीन[6] एक ते शाखामंडित[7] पूर्ण
तया ग्रीवार्ल[8] लतिका वेष्टन करून जाती सुरवाडें[9]. २.
कर्पूर कर्दळी नारिकेली चूतवृक्षें[10] लवले फळीं
कंटकी[11] फळांची नव्हाळी[12] लागलीं मुळीं[13] असंख्य. ३.
द्राक्षीमंडपातळीं दाट वाहती अमृतरसाचे पाट
फणसफळें त्यागोनि देट दांविती[14] वाट सिंधूची. ४.
जाई जुई चंपक मालती बकुल मोगरे कांचन शेवती
केतकीवनें घमघमती पराग क्षिती सुगंध. ५.
अगरचंदन देवदारू हरिचंदन मैलागरू
वृक्षवेष्टित विषधरू[15] भूतें[16] जैशीं निधांना[17]. ६.
न्यग्रोध[18] पालाश[19] पिप्पलतरू[20] जे देवत्रयाचे अवतारू
बिल्व तुळसी हरिहरू ज्यांचे पत्रें तोषती. ७.
प्रवेश करितां तये वनीं राजा आश्चर्य देखे नयनीं
धेनु व्याघ्र एके स्थानीं एकमेकां चाटिती. ८.

---

१ अर्थ पुष्कळ असें. २ लोकांचें मन हरण करणारें. ३ अक्षरें थोडीं असें. ४ इंद्राचा बाग. ५ सरोवराच्या वासानें. ६ फांद्या नाहींत. ७ फांद्यांसह. ८ मानेला—फांदीला. ९ सुखानें, सहज. १० आंबा. ११ फणसांची. १२ कौतुक. १३ मुळापासून. १४ रस वाहतो, असा भावार्थ. १५ सर्प. १६ माणसें. १७ ठेवा. १८ वड. १९ पळस. २० पिंपळ.

नकुळ[1] सर्प क्रीडती सुखें मार्जारीस्तना लागती मूषकें[2]
सिंह करिणै[3] करिती कौतुकें वनामाजी विचरती. ९.
उलूका[4] निरवूनि पिलियासी वायस[5] जाती चारियासी
विश्वामित्रमाया ऐशी सहसा न कळे मानवां. १०.

## मुक्तेश्वर.

धर्मराज इंद्रलोकीं गेला तेव्हां त्याच्या बरोबर एक कुत्रा होता. त्या संबंधानें इंद्राचें आणि धर्मराजाचें भाषण झालें, तें असें:—

### आर्या.

शक्र ह्मणे ते गेले स्वर्गीं सोडुनि मनुष्य-देहातें
योद्धा कृतार्थ होउनि टाकुनि मार्गण[6] धनुष्य दे हातें १.
दिव्य रथीं बैसुनियां जाया तूं मात्र उचित या देहें
बा स्वर्गलोक ऐसें यश जो अत्यंत शुचि तया दे हें. २.
धर्म ह्मणे श्वा घे नच करु हा जन घात सारमेयाचा
मत्संगी आत्यांचा आत्मा अनघा तसा रमे याचा. ३.
नाकीं मम गति जसि तसि हो मद्भक्ताहि या कुतरियाची
कीं जनभूतीं अदया अवलंबुनि शिव जसा कुर्तरि याची. ४.
शक्र ह्मणे सुख भोगीं स्वर्गीं झालासि मान्य मत्सम या
अपवित्रा टाकुनि दे न भज अशा जाणतोसि सत्समया. ५.
धर्म ह्मणे भक्त त्यज ह्मणसी परि मज घडे न आर्या तें
स्वर्गसुखार्थ अकार्या न करिन सोडून मी सुकार्यातें. ६.
जीस्तव भक्तत्याग श्रीसीं त्या मज नसोचि संगमन
सोडिल सर्वस्वासि न माझें पळभरहि भक्त-संग मन. ७.
इंद्र ह्मणे बा धर्मा नाकीं नाहीं स्थळ श्ववंतास
हरिति श्वदृष्ट सर्व क्रोधवश कळे तुलाहि संतास. ८.

---

१ मुंगूस. २ उंदीर. ३ हत्ती. ४ घुवड. ५ कावळा. ६ बाण. ७ कुत-ऱ्याचा. ८ कुदशा.

धर्म ह्मणे भक्ताचा त्याग असे ब्रह्मवधसम स्पष्ट
तस्मात् स्वसुखार्थ न या त्यजिन नसो सुख जया पुढें कष्ट. ९.
शक्र ह्मणे प्रिय-दार-भ्रात्यांच्या कठिण मानस त्यागा
श्वा बहु मानुनि कैसें दे होउनि हठि न मान सत्या गा. १०.
धर्म ह्मणे या लोकीं मेल्यांसी संधिविग्रहहि नाहीं
उठवावें तरि माझ्या आंगीं सामर्थ्य तें नसे कांहीं. ११.
यास्तव केला दार-भ्रात्यांचा तो अकार्य न त्याग
या भक्ता शुनकातें टाकिन तरि मज घडेल अत्यांग. १२.
मित्रद्रोह स्त्रीवध शरणागतदान-विप्र-धन-हरण
बा या चतुष्टयासम भक्तत्याग न घडो घडो मरण. १३.

महाप्रस्थानिकपर्व.

ह्यावरून धर्मराजाच्या अंतःकरणाचा थोरपणा व्यक्त होतो. स्वर्ग आपल्या कुत्र्याला लाभत नाहीं, त्यापक्षीं तो आपणासही नको! असें त्याचें ह्मणणें होतें!

देव आणि संत ह्यांची तुलनाः—

### ओव्या.

देवासमान ह्मणावे संत हे गोष्टीच असंमत
देव जैशी भक्ती देखती सत्य होती तैसे प्रसन्न. १.
जे सेवा करिती बहुत त्यांस उत्तम फळें देत
जे भजन न करिती यथार्थ त्यांवरी देव कोपती. २.
त्यांस दरिद्र आणोनी प्राण्यांसी पाडिती अधःपतनीं
तैसी नव्हे संतांची करणी समसमान सर्वांतें. ३.
सर्वांवरी दया समान एक उत्तम एक हीन
हें न देखतांच संत पूर्ण जन वन समान त्यांसी. ४.
एकाचें करावें कल्याण न भजे त्याचें अकल्याण
हें देवाचें कर्तृत्व पूर्ण संत समान सर्वांतें. ५.

श्रीधर.

१ मोठें पाप.

भारती युद्धाच्या प्रसंगीं रथाचें चाक जमिनींत रुतल्यामुळें कर्णास लढतां येईना, म्हणून तो खालीं उतरून, कृष्णार्जुनांस म्हणूं लागला कीं, मी अडचणींत असतां, मजशीं युद्ध करणें हें तुम्हांस वीरांस धर्मविहित होणार नाहीं, त्यास कृष्णानें कौरवांचीं अधर्म-कृत्यें काढून चरचरित उत्तर दिलें, त्याचें वर्णन **पंत** करितातः—

## आर्या.

जेव्हां तूं दुर्योधन दुःशासन शकुनि एकमति झालां
कैसे कपटद्यूतीं[1] चित्तींहि न धर्म लंघितां भ्यालां. १.

जेव्हां सभेसि नेली पांचाळी[2] मानिलें मनीं शर्म[3]
तेव्हां गेला होता कोठें राधासुता[4] तुझा धर्म. २.

राज्य न देसी करवुनि वनवासाज्ञातवासही जेव्हां
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना तेव्हां. ३.

केले दग्ध जतुगृहीं[5] त्वां पांडव वारणावतीं जेव्हां
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना तेव्हां. ४.

चारुनि विषान्न भीमा सर्प डसविले नृपें असें खोटें
कर्म करवितां कर्णा होता तव धर्म तेधवां कोठें. ५.

फेडी वस्त्र सतीचें[6] जेव्हां उघडें करावया आंग
गेला होता कोठें धर्म तुझा तेधवां वृषा[7] सांग. ६.

खरदुर्वाक्यशरशतें[8] भेदित होतासि जेधवां धर्म
तेव्हां गेला होता कोठें राधासुता तुझा धर्म. ७.

अभिमन्यु बाळ बहुतीं वधितां त्वां वारिलें न तें कर्म
तेव्हां गेला होता कोठें राधासुता तुझा धर्म. ८.

---

१ कपटमति डावांत. २ द्रौपदी. ३ आनंद. ४ कर्णा. ५ लाक्षागृहांत. ६ द्रौपदीचें. ७. कर्णा-पक्षीं बैला. ८ कठिण भाषणरूप शरांनीं.

कृष्णशिष्टाईच्या वेळीं दुर्योधन कृष्णाचें, धृतराष्ट्राचें आणि विदुराचें ऐकेना, तेव्हां, धृतराष्ट्राच्या सांगण्यावरून गांधारीनें त्यास बोध केला, त्याचें वर्णनः—

## आर्या.

गांधारी त्यासि ह्मणे वत्सा बहु कष्टतो दुरभिमानी
कां त्यजिसि गुरूक्ति? इला आत्माधिक बहु गुणें सुरभि मानी. १.
अन्याय-कृष्णवर्त्मा[1] न स्पर्शो कीर्तिकापुरा तनया!
ज्या लोभा भजसी तूं भजले नाहींत बा! पुरातन[2] या. २.
कामें कोपें लोभें नागविले अमित यांसि जे भुलले
यांच्या कुदृष्टिपातें तेजस्वी पुरुषहीरहि[3] उलले. ३.
न उगाचि मूकसा तूं चित्तांत धरूनि दंभदर्प रहा
बा! दुरभिमान न बरा देइल धनपतिकरींहि खर्परें[4] हा! ४.
अहित कथील तरि कसा गुरु? बाप कसा? तसीच आइ कसी?
नाइकसी गुरुवचन क्षुद्रवचन बहु जपोनि आइकसी. ५.
सत्यप्रेमें[5] स्वामी न[6] म्हणविती हे दयाब्ध मामाजी[7]
'मी राजा' ऐसें जें काय म्हणसि खेद या भ्रमामाजी. ६.
राज्यार्ध पांडवां दे तूं घे राज्यार्ध, बहु तुला बा! हें
साम करीं यश रुसलें मुरडुनि तुज पाहतें मुला! बाहें. ७.
निष्कंटक राज्य करिसि हा महिमा सत्य पांडवांचा रे
सत्सख्य करूनि यशें धवल करा सत्यपांड वांचा रे! ८.
भीष्मद्रोणाद्यार्य प्राणांतें सोडितील न तयांतें
सामर्थ्य असोनि अधिक बहु ते आहेत साधु नत यांतें. ९.
क्षुद्र शकुनिदुःशासनकर्ण यश क्षुद्रसंगरहितास
कोणा होइल केला भूतबळें रुद्रसंगर हितास? १०.

---

१ अन्यायरूप अग्नि. २ जुने लोक. ३ पुरुषरूप हिरे. ४ खापर. ५ सत्यावर प्रेम आहे म्हणून. ६ स्वामी न म्हणविती. ७ भीष्म—सासरा. ८ निर्मल. ९ ब्रह्मांड.

सर्व सुहृत्तमकृष्ण प्रभु याची धरुनि कास सर्व तरे
तूं किति ? तरले याच्या नामें बहु सागरांत पर्वत रे. ११.
तुज पांडवजय दुर्घट नारळ हरिजेल काय खर्वतरें
कृष्णोक्तें सख्य करीं याचि उपायें अनिष्ट सर्व तरें १२.

मोरोपंत.

मार्कंडेयानें पांडवांस कलियुगाचीं लक्षणें सांगून ठेविलीं होतीं. तीं अशीं:—

ओंव्या.

तुम्हांसारखे धर्मपरायण कलियुगीं न होती सज्जन
धृतराष्ट्रा ऐसे दुर्जन बहुसाल जन्मतील. १.
कलि प्रवर्तेल दारुण एकरूपी होतील चाऱ्ही वर्ण
कोणी कोणाचा विटाळ न मानून यथासुखें वर्ततील. २.
विप्र वेदमंत्र त्यजून करितील शूद्राचें आचरण
स्त्रिया पुरुषांस छळून जारकर्मीं रत होती. ३.
बुडेल वेदशास्त्रपुराण नाना कुतर्क उठतील पूर्ण
टाकोनी शिवविष्णुपूजन कुमार्गें जन आचरती. ४.
गायी म्हशी न दुभती अेवि अजा लोक पाळिती
मद्यमांसरत जन होती मत्स्य भक्षति मुख्य वर्ण. ५.
मातापितरांची निंदा पुत्र करितील बहु आपदा
शिष्य न धरिती गुरुमर्यादा आज्ञा कदा न पाळिती. ६.
देवनिंदा करिती अपार तेणें येईल दरिद्र
विधवांचीं धनें समग्र नेतील नृप हिरोनी. ७.
स्वेच्छाचारी स्त्रियापुरुष दाता नाहींच निःशेष
विप्र विकिती नाना रस ध्यान स्त्रियांचें परपुरुषीं. ८.

---

१ फार ठेंगणा. २ मेंढी.

लोपेल वैराग्य भक्तिज्ञान वाढेल कापट्य जारण मारण
नाना उपाय करून द्रव्य हरितील परस्परें. ९.
कोणी कोणाचा स्नेह न धरी द्रव्यलोभी जन अहोरात्रीं
प्राणांत झालिया निर्धारीं ठेवणें आपलें न सांगती. १०.
अधर्मरत सर्वजन द्रव्यालागीं वेंचिती प्राण
असत्क्रिया करून भाषनेम मोडिती. ११.
माता आणि पितर यांस पुत्र घालिती बाहेर
बालविधवा करोनि भ्रतार करिती संसार अन्य देशीं. १२.
पुत्र मारील पित्यातें पुत्र मरेल पितृहस्तें
भ्रताराचे प्राणातें स्त्री घेईल धनलोभें. १३.
बंधु बंधूचा घेती प्राण गुरुशिष्यांत विकल्प पूर्ण
संन्यासी दिगंबर धन सांचवून ठेवितील. १४.

श्रीधर.

हीं लक्षणें सांगितल्यास आज किती शतकें लोटलीं आहेत, ह्याचें अनुमान देखील बरोबर करितां येत नाहीं. तरी, चमत्कार असा आहे कीं, त्यांतलीं बरींच लक्षणें सध्या आपल्या स्थितींत आपणांस पर्यायेंकरून दिसून येत आहेत. ह्याविषयीं विचार करितां असें मनांत येतें कीं, “कोणी कोणाचा विटाळ न मानून यथासुखें वर्ततील” असें जें म्हटलें आहे, त्यांत “ऐसें कैसें रे सोंवळें” ह्याचा समावेश होऊन, तें कालगतीनें तर झालेंच आहे, पण त्यास आगगाड्या, आगबोटी इत्यादि वाहनांच्या प्रचारानें फार भर पडली आहे. “वेदमंत्र त्यागून,” “शूद्राचें आचरण” वगैरे जें झालें आहे, त्यास परधर्मी धर्मोपदेशकांची धर्मचर्चा आणि अलीकडचें भौतिक पांश्चात्य शिक्षण हीं पुष्कळ कारणभूत झालेलीं आहेत. “नाना उपाय करूनी द्रव्य हरितील परस्परें” हें जें काय दिसत आहे,

त्यास कारण, देशांतलें दारिद्र्य, आणि उद्योगधंद्यांचा अभाव, हें आहे. “बालविधवा करोनि भ्रतार” इत्यादि जें तेव्हां अत्यंत भयंकर आणि हृदयभेदक पाप वाटत होतें, तें, आतां, पुण्य वाटत नाहीं, पण पाप तरी नाहीं, असें जें झालें आहे, तें परराष्ट्रांच्या रीतिभातींच्या परिचयाचें आणि धर्मशोधाचें आणि अनुभवाचें फल आहे. तरी हें इतकें सगळें इतक्या दुरून आमच्या ऋषींच्या दृष्टीस पडलें होतें, ह्यावरून त्यांच्या ज्ञानसामर्थ्याचें अनुमान करावें. आणखी शंभर वर्षांनीं आपल्या समाजाची स्थिति कशी होईल, तिचें सरासरी तरी, चित्र सध्याच्या काळच्या एकाद्या ऋषीस काढतां येईल काय? शंकाच आहे.

आपलें वचन राखण्याविषयीं अत्यंत चिंताक्रांत पाहून तारामतीनें हरिश्चंद्रास म्हटलें आहेः—

### आर्या.

राया या संसारीं बुध संरक्षावयासि सत्य जिंती[1]<br>
सर्वस्व त्यजिती परि सत्य स्वप्नींहि साधु न त्यजिती. १.<br>
सत्यबहिष्कृत[2] नर जो पितृवन[3]सम वर्जनीयता[4] पावे<br>
पूर्वज सर्व निवावे सत्यें अनृतेंकरूनि तापावे. २.<br>
हयमेध[5]सप्तकासह ज्यास सविधि राजसूयही घडला<br>
सत्यच्युत कृति[6]रात स्वर्गांपासुनि तसाहि तो पडला. ३.<br>
झालें अपत्य मजला इच्छुनि फल हेंचि करिति बुध भार्या<br>
म्हणुनि मज विकुनि घेउनि धन द्यावी दक्षिणा तया आर्या. ४.

**हरिश्चंद्राख्यान.**

---

१ जगतात. २ सत्य नाहीं असा. ३ स्मशानासारखा. ४ त्याज्यता. ५ सात अश्वमेधांसह. ६ नहुषराजा.

ह्या भाषणामध्यें पतिप्रेम, भार्या करण्याचा मुख्य हेतु, आणि सत्यनिष्ठेचा महिमा हे विषय किति जीवाला लागून राहातात! अंतःकरण पवित्र असल्याशिवाय असें भाषण तोंडांतून कसें निघेल?

श्रद्धामाहात्म्यः—

आर्या.

श्रद्धाचि करितसे हित धर्मांचें जेविं माय तनयाचें[1]
जप तप मख[2] गुरुपूजा मुख्य श्रद्धाचि आयतन[3] यांचें. १.
श्रद्धेनें भजत्यातें[4] पाषाणहि फलद होय जो अज्ञ
तोही सद्गुरु होतो अश्रद्धेनें वृथा महायज्ञ[5]. २.
स्पष्ट अवद्धहि मंत्र श्रद्धेनें जपत्या[6] जना फळतो
जैशी श्रद्धा तैशी सिद्धि सुपरमार्थ[7] हा बुधां[8] कळतो. ३.

मोरोपंत.

भगिनींनो, आपल्या वाङ्मयांत नीति अपार भरली आहे. आणि आपल्या कवींची प्रासादिक लेखनपद्धति अशी कांहीं हृदयंगम आहे कीं, त्या वाङ्मयाच्या श्रवणानें आणि पठणानें तिचा ठसा मनावर उठल्याशिवाय आणि त्याचा परिणाम कृतीवर झाल्याशिवाय राहातच नाहीं. ह्या नीतिबोधाच्या संबंधानें आमच्या तत्वज्ञानी मनुष्याच्या वृत्तीचे साहा जीव मानिले आहेत. त्यांस षड्रिपु म्हणतात. ते मनुष्यास पापास प्रवृत्त करितात, तसेच त्यास पुण्यवर्ती करण्यासही साधनीभूत होत असतात. म्हणून ते नसावे कोठें आणि असावे कोठें, ह्याचें वर्णन नारदनीतींत केलें आहे. हें पुरुषांस लक्षून आहे, तें थोड्या पर्यायभेदानें स्त्रीजनांसही ग्राह्य आहेः—

---

१ मुलाचें. २ यज्ञ. ३ स्थळ. ४ भजणाऱ्याला. ५ मोठा यज्ञ. ६ जप करणाऱ्याला. ७ उत्तम फल. ८ शाहण्याला.

## ओव्या.

काम नसावा परस्त्रियेचा क्रोध नसावा सत्पुरुषाचा
लोभ नसावा शरीराचा मोह पुत्राचा बाधक. १.
मद नसावा सुहृदजातीं मत्सर नसावा सर्वांभूतीं
तुझी वर्तणुकीची शक्ति सांग अशी आहे कीं. २.
काम असावा ईश्वरभजनीं क्रोध असावा इंद्रियदमनीं
तीर्थप्रसादशेषग्रहणीं लोभ अपार असावा. ३.
मोह असावा सज्जनांसीं मद असावा दुर्जनांसीं
मत्सर सदा संसारासीं असावा तो असे कीं. ४.

मुक्तेश्वर.

अशी सर्व प्रकारची नीति आपल्या पद्यकवींच्या वाङ्मयांत भरली आहे. तुकाराम नामदेवादिकांचे अभंग, समर्थांचा दासबोध, वामनपंडितांचीं तीन शतकें, हें सगळें तेंच आहे. त्यांचें समालोचन फार मोठें आहे. तें करण्यास येथें अवकाश नाहीं. म्हणून त्यांतले अगदीं चुटपुटते थोडेसे मासले येथें घ्यावे लागले आहेत.

त्याप्रमाणेंच, जगाची राहाटी बिकट आहे. ती नीट पाहून आपला निभाव लागेल असें वागायास पाहिजे, म्हणून आमच्या कवींनीं व्यवहारनीतिही सांगितली आहेः—

## ओव्या.

ऐश्वर्य लाधल्या संपूर्ण धर्मीं वर्तत असे कीं मन
राज्यपदें दुरभिमान तुज संचरला नाहीं कीं. १.
वडील आचरले जो धर्म तोच चालविसी कीं नेम
विहितभंगाचा कर्दम तुज लेपला नाहीं कीं. २.
अहोरात्रीं साठ घडी लोटितां पापपुण्याची जोडी
किती झाली हें घडी घडी विचारीत अससी कीं. ३.

समता संतोष सद्विवेक चौथा साधुसंग देख
ह्यांसी करोनियां सख्य मित्रभावें अससी कीं. ४.
शुश्रूषा श्रवण ग्रहण धारण ऊहापोह अर्थ विज्ञान
तत्वज्ञानेंसीं आठही गुण सेविसी कीं सुजाणा. ५.
औषधनेम शरीरातें वृद्धसेवन मानसातें
दोन प्रकारें आपणातें रक्षिसी कीं सुजाणा. ६.
निद्रा आलस्य भय क्रोधता अमार्दव आणि दीर्घसूत्रता
साही अनर्थांचिया माथां पाय देऊनि अससी कीं. ७.
बहुत लाधे स्वल्प यत्नीं तेथें आलस्य नसे कीं मनीं
स्वल्प लाभ बहुत हानी तेथें उद्योग नसे कीं. ८.
तुजसीं दावूनि आप्तता शत्रूसीं पाववितो वार्ता
ऐसे कोण ते तत्वता वोळखोनी अससी कीं. ९.
अंतःकरण आणि शरीर नियमीं नपवे विकार
शब्द तो सजीव गिरिवर न चळे न ढळे नुखळे कीं. १०.

मुक्तेश्वर.

सगळ्या इतिहासशास्त्राचें सार नीति आहे. ती नीति पांडवप्रतापांत फार चांगली सांगितली आहे. तिचे एक दोन मासले येथें सादर करितों. आधीं प्रथम नारदांनीं धर्मास राजनीति सांगितली आहे. ती अशीः—

### ओव्या.

पृथ्वीचें राज्य आलें समस्त तरी धर्मावरी असावें सदा चित्त
कामनाबुद्धि टाकोनि यथोचित कर्में कृष्णार्पण करिसी कीं. १.
कुल शील विद्या धन राज्य तप रूप यौवन
ह्या अष्टभेदेंकरून मन भुलत नाहीं कीं. २.
सर्वज्ञता अंगीं असोन निरभिमान अससी कीं पूर्ण
ऐश्वर्य असोन उदास मन धर्मराया आहे कीं. ३.

प्रज्ञा अंगीं असोनि बहुत भोळेपणा न सांडिजे किंचित
अंतरीं बहु उदारत्व सुहृद्‌ऋषींशीं आहे कीं. ४.
श्रेष्ठांचा मूळ आचार तोचि आचरशी कीं सादर
अविहित कर्म अनाचार नावडे कीं सर्वज्ञा. ५.
इंद्रियें आहेत कीं आधीन नित्यनैमित्तिकीं आर्त मन
निषिद्ध कर्म संपूर्ण लोटिसी कीं पातल्या. ६.
भाग्य आलें अकस्मात भोगिसी कीं सुहृदांसमवेत
शमदमादि साधनीं यथार्थ बुद्धि सदा वसे कीं. ७.
कर्ता सर्व ईश्वर म्हणोनि न धरावा अहंकार
आपलें सुकृत आचार स्वमुखें कदा न बोलावा. ८.
आपले काजीं वेंचिले प्राण त्यांचीं करिसी कीं कुटुंबें पालन
स्वस्त्री टाकोनि मन परस्त्रीविषयीं न रमे कीं. ९.
सर्व भूतीं द्यावें अन्न पूजा करावी सत्पात्र पाहून
मागें न बोलावें दुजियाचें न्यून हें सुलक्षण असे कीं. १०.
मातापितयांचें भजन पुत्र करिती कीं अनुदिन
हें स्वग्रामांतील वर्तमान तुजलागीं श्रुत असे कीं. ११.
शिष्य गुर्वाज्ञा पाळिती स्त्रिया भ्रतारांसी भजती
सेवक स्वामिद्रोह न करिती अशीच स्थिती असे कीं. १२.
सासू सासऱ्यांची सेवा सुना करिती कीं नरपार्थिवा[2]
रात्रीं चोर जार सदैवा नगरामाजी न फिरती कीं. १३.
क्षुधार्थी तृषित घरा येती सोयऱ्यांऐशी त्यांवर प्रीति
पुत्राहून स्नेहरीती संतांवरी करिसी कीं. १४.
मठ धर्मशाला प्रासाद कूप वापी तडाग सुबद्ध
हीं खचलीं कीं करोनि सिद्ध जीर्णोद्धार करिसी कीं. १५.
एकांत विचार गौप्य समस्त प्रगटत नाहीं कीं जगांत
मंत्र आयुष्य वित्त न सांगसी कीं कोणातें. १६.

---

१ बुद्धि. २ राजा.

एक प्रकट लोकीं बोलावें एक साधुकर्णींच सांगावें
एक मनींच गौप्य ठेवावें हें तूं बरवें जाणसी कीं. १७.
अल्प यशास मोठी हानि गोष्टी न धरावी ते मनीं
दान मान सुकृत जनीं प्रकट कदा न करिसी कीं. १८.
आदा पाहोनियां वेंच करावा हें जाण साच
गुरुगृहीं पुरविंजे खर्च सर्वदा हें जाणसी कीं. १९.
शब्द बोलसी जो अर्थ तो न चळे जैसा पर्वत
हित सांगती जें साधुसंत हृदयीं दृढ धरिसी कीं. २०.

**श्रीधर.**

विदुरानें धृतराष्ट्रास नीति सांगितली आहे. ती अशीच अत्यंत विचारणीय आहे. तींतल्या कांहीं गोष्टी येथें देतों:—

## ओव्या.

इंद्रियांसहित मन जिंकून केलें आपणाधीन
दुराचारीं गांजितां दुर्जन अंतःकरण दुखवेना. १.
दयेचा तो भांडार केवळ निर्भय निःशंक निर्मळ
त्याचें दातृत्व देखोनि विकळ अमरतरु होय पैं. २.
जाणीव न धरावी कदा कोणाचीही न करावी निंदा.
नुल्लंघावी वेदमर्यादा निष्ठुर वचन न बोलावें. ३.
आपण न करावें पापाचरण दुसऱ्याचे दोष टाकावे आच्छादून
हें सज्जनाचें लक्षण बहु भाषण कासया. ४.
सत्कर्म दानाध्ययन येथें आळस न करावा एक क्षण
स्त्रीभोग निद्रा बहु भोजन येथें उदास असावें. ५.
मैत्री इच्छिजे जरी विपुल तरी वाग्वाद न करावा समूळ
अर्थसंबंध करितां केवळ कलह होय मित्रत्वीं. ६.
सुंदर सधन परनारी एकांत पाहोनि प्रार्थना करी
कामविकार न उठे अणुभरी तरी तो ईश्वर म्हणावा. ७.

निंदक सोडिती वाग्बाण पुढें केलें क्षमा ओढण
खेद कदा न उठे मनांतून तरी तो ईश्वर मानावा. ८.
आपण आचरे सत्कर्मराहटी दुसऱ्याचे गुणदोष नाणी दृष्टी
आत्मरूप पाहे सर्व सृष्टी तरी तो ईश्वर म्हणावा. ९.
आपलें महत्कार्य सोडून परोपकारीं घाली मन
परपीडा नावडे चित्तांतून तरी तो ईश्वर म्हणावा. १०.
दिवसा ऐसें वर्तावें पाहें जेणें रात्र सुखरूप जाये
संसारीं ऐसें वर्तावें स्वयें जेणें इहपरत्र सुखरूप. ११.
कार्य त्वरित हेंच करणें जन्ममरणाचें मूळ छेदणें
क्रियेसमवेत ज्ञान बोलणें मोक्षतरूचें बीज हेंची. १२.
धर्म तोचि शुद्ध पंथ मन शुद्ध तोचि शुचिष्मंत
विवेकी तोचि पंडित सर्वभूतीं समदर्शन. १३.
स्त्रीचरित्रें खंडिला नच जाय तोचि चतुर हा निश्चय
सदा हळ हळ ज्यासि होय दरिद्री पाहें तोच एक. १४.
तृणापरिस नीचपण परयाच्ञा जयालागुन
विचाररहित न करी कारण जागा जाण तोचि सदा. १५.

**श्रीधर.**

असाच बोध सनत्सुजात ब्राह्मणानें सज्जनलक्षणें सांगून धर्मास केला आहे. त्यांतल्या कांहीं ओंव्या येथें घेतों:—

## ओव्या.

आपुलें सुकृत जो पाही स्वमुखें न बोले कालत्रयीं
आपुले विद्येची नवाई लोकांमाजी दावीना. १.
न करी दांभिक भजन न बोले कोणाचें निंदास्तवन
चराचर जीव संपूर्ण आत्मरूप पाहे पैं. २.
तो आपण तरून साचार बहुतांचा करी उद्धार
तो न दंडी स्वशरीर व्रतोपवासें करोनियां. ३.

तो ऐके तेंच श्रवण तो बोले तेंच कीर्तन
आपुल्या स्वमुखीं समाधान तेंच स्मरण तयांचें. ४.
करी गुरुचरणोपासन परोपकारीं सदा मन
तेंच तयाचें अर्चन समाधान सर्वभूतीं. ५.
सर्वभूतीं तयाचें वंदन सर्वांहून म्हणे मी सान[1]
हेंचि दास्य संपूर्ण निरहंकार कृति करी तो. ६.

**श्रीधर.**

शिष्टाई करण्यास श्रीकृष्ण आले तेव्हां त्यांनीं धृतराष्ट्रास नीति सांगितली, ती अत्यंत ग्राह्य आहे. तिचें थोडेंसें स्वरूप येथें दाखवितोंः—

### ओव्या.

परदारा आणि परधन येथें कदा न ठेविंजे मन
वेदमर्यादा नुल्लंघावी पूर्ण प्राणांतही झालिया. १.
सदा सेवावे संतसज्जन गुरुभजनीं सावधान
त्यागावे विचारें दुर्जन त्यांचें अवलोकन न करावें. २.
जरी क्लेशकाळ पातला बहुत तरी धैर्य न सांडावें यथार्थ
गुरुभजन पुण्यपंथ न सोडावा सर्वथा. ३.
सत्संग धरावा आधीं नायकावी दुर्जनाची बुद्धि
कामक्रोधादिक वादी दमवावे निजपराक्रमें. ४.
कामक्रोधमदमत्सर हे गृहांत येऊं न द्यावे तस्कर
आयुष्य क्षणिक जाणोनि साचार सारासारविचार करावा. ५.
दैवें भाग्य आलें थोर त्याचा गर्व न धरावा अणुमात्र
अथवा एकदाच गेलें समग्र तरी धीर न सांडावा. ६.
ज्या गोष्टीनें अनर्थ होय आपुलें कुळ पावे क्षय
ते गोष्टी चतुरवर्य मान्य कधींही न करिती. ७.

---

१ लहान.

विवेकबुद्धीच्या बळें अनर्थ तितका टाळावा कुशळें
संतवचनें प्रांजळें हृदयें दृढ धरावीं. ८.
परद्रव्याचा अभिलाष जाणून प्राशन करणें विष
परनिंदा परद्वेष अनर्थांसी काय उणें. ९.
पाषाण धरोनि हृदयीं उडी घातली महाडोहीं
अहिमुखीं हस्त घालितां पाहीं मग अनर्थांस काय उणें. १०.
नर तोच पुरुषार्थी जाण परसती आणि परधन
येथें जो कदा न घाली मन तोच धन्य शास्त्र म्हणे. ११.

**श्रीधर.**

तुकाराममहाराजांच्या अभंगांत मुख्य प्रकार दोन तीन दिसतात. एक देवास आळविणें, दुसरा त्याची थोरवी गाणें, आणि तिसरा जनास बोध करणें. ह्या तिहींतही एक मोठा गुण ह्मटला म्हणजे प्रसाद होय. तो सहृदयांस तेव्हांच कळतो. त्यांच्या वाणींतला रस श्रोत्यांच्या अंतःकरणांत उतरण्यास मुळींच उशीर लागत नाहीं. ह्या तिन्ही प्रकारचे त्यांचे सळमिसळ कांहीं अभंग येथें सादर करितोंः—

दगडाच्या देवा बगाड नवस बाईल कथेस जाऊं नेदी. १.
वेंची धनराशी बांधिलें स्मशान दारीं वृंदावन झाड मानी. २.
चोरें नागवितां न करी त्याची खंती परी द्विजा हातीं नेदी रुका. ३.
करी पाहुणेर व्याह्याजांवयांसी आल्या अतीतासी पाठमोरा. ४.
तुका म्हणे जळो धिग त्याचें जिणें भार वाही सीण वर्म नेणें. ५.

प्रेम नये सांगतां बोलतां दावितां अनुभव चित्ता चित्त जाणे. १.
कासवीचें बाळ वाढे कृपादृष्टी दुधा नाहीं भेटी अंगसंगें. २.
पोटामध्यें कोणें सांगितलें सर्पा उपजत लपा म्हणउनी. ३.
बोलों नेणे परी जाणे गोड क्षार अंतरीं विचार त्यासी ठावा. ४.
तुका म्हणे बरें विचारावें मनीं आणिकां भल्यांनीं पुसों नये. ५.

सोइऱ्यासी करी पाहुणेर बरा काढितो ठोंबरा संतांलागीं. १.
गाईसी देखोनी बदबदां मारी घोड्याची चाकरी गोड वाटे. २.
पान फूल नेतो वेश्येसी उदंड ब्राह्मणास खांड देऊं नेदी. ३.
सर्वकाळीं धर्म न करी नासरी[1] वेंची राजद्वारीं उदंडची. ४.
कीर्तना जावया होतसे हिंपुष्टी[2] खेळतो सोंगटीं रात्रंदिस. ५.
बाइलेच्या गोता आवडीनें पोशी मातापितयांसी दवडीतो. ६.
तुका म्हणे त्याच्या थुंका तोंडावरी जातो यमपुरी भोगावया. ७.

बाळ बापा म्हणे काका तरी तो कां निरपराध. १.
जैसा तैसा भाव गोड पुरवि कोड विठ्ठल. २.
साकरेसी म्हणतां धोंडा तरि कां तोंडा न रुचे. ३.
तुका म्हणे आरुषें[3] बोल नव्हे बोल हा साच. ४.

ऐसा हा लौकिक कदा राखवेना पतितपावना देवराया. १.
संसार करितां म्हणती हा दोषी टाकितां आळशी पोटपोसा. २.
आचार करितां म्हणती हा पसारा न करितां नरा निंदीताती. ३.
संतसंग करितां म्हणती हा उपदेशी येर अभ्यासासी ज्ञान नाहीं. ४.
धन नाहीं त्यासी ठायींचा करंटा समर्थासी ताठा लाविताती. ५.
बहु बोलों जातां म्हणती वाचाळ न बोलतां खोल म्हणती गर्वी. ६.
भेटीस न जातां म्हणती निष्ठुर येतां जातां घर बुडविलें. ७.
लग्न करूं जातां म्हणती हा मातला न करितां झाला नपुंसक. ८.
निपुत्रिका म्हणती पाहा हो चांडाळ पातकाचें मूळ पोरवडा. ९.
लोक जैसा ओक धरितां धरवेना अभक्तां जिरेना संतसंग १०.
तुका म्हणे आतां ऐकावें वचन त्यजुनियां जन भक्ति करा. ११.

---

१ अर्धी दमडी. २ कष्टी. ३ मूर्खपणाचें.

सदा सर्वकाळ अंतरीं कुटिल तेणें गळां माळ घालूं नये. १.
ज्यासी नाहीं धर्म दया क्षमा शांती तेणें अंगा विभूती लावूं नये. २.
जयासी न कळे भक्तीचें महिमान तेणें ब्रह्मज्ञान बोलों नये. ३.
ज्याचें मन नाहीं लागलें हातासी तेणें प्रपंचासी टाकूं नये. ४.
तुका म्हणे ज्यासी नाहीं हरिभक्ति तेणें भगवें हातीं धरूं नये. ५.

काहीं न मागे कोणासी तोच आवडे देवासी. १.
देव तयासी म्हणावें त्याचे चरणीं लीन व्हावें. २.
भूतदया ज्याचे मनीं त्याचे घरीं चक्रपाणी. ३.
नाहीं नाहीं त्यासमान तुका म्हणे मी जामीन. ४.

जे गाती अखंड विठ्ठलाचें गीत त्यांचे पायीं चित्त ठेवीन मी. १.
जयांसी आवडे विठ्ठलाचें नाम ते माझे परम प्राणसखे. २.
जयांसी विठ्ठल आवडे लोचनीं त्यांचें पायवणी स्वीकारीन. ३.
विठ्ठलासी जिहीं दिला सर्व भाव त्यांच्या पायीं ठाव मागईन. ४.
तुका म्हणे रज होईन चरणींचा म्हणविती त्यांच्या हरिचे दास. ५.

करितों कवित्व म्हणाल हे कोणी नव्हे माझी वाणी पदरची. १.
माझिये उक्तीचा नव्हे हा प्रकार मज विश्वंभर बोलवितो. २.
काय मी पामर जाणे अर्थभेद वदवी गोविंद तेंचि वदें. ३.
निमित्त मापासी बैसविलों आहें मी तों कांहीं नव्हे स्वामीसत्ता. ४.
तुका म्हणे आहें पाईकचि खरा वागवितों मुद्रा नामाची हे. ५.

वटवट केली न विचारितां मना आली. १.
मज कराल तें क्षमा कैसें नेणों पुरुषोत्तमा. २.
उचित न कळे जिव्हा भलतेंचि बरळे. ३.
तुका म्हणे कांहीं लौकिकाची चाड नाहीं. ४.

दुधाचिया अंगीं निघे ताक लोणी एका मोलें दोन्ही मागूं नये. १.
आकाशाचे पोटीं चंद्र तारांगणें दोहींशीं समान पाहूं नये. २.
पृथ्वीचिया पोटीं हिरा गारगोटी दोहोंशीं संसाटी करूं नये. ३.
तुका म्हणे तैसे संत आणि जन दोहोंसी समान भजूं नये. ४.

लांबलांब जटा काय वाढवूनी पावडें घेऊनी क्रोधें चाले. १.
खायाचा बोळसा शिव्या दे जनाला ऐशा तापशाला बोध कैंचा. २.
सेवी भांग अफू तंबाखू उद्दंड परि तो अखंड भ्रांतीमाजी. ३.
तुका म्हणे ऐसा सर्वस्वें बुडाला त्यासि अंतरला पांडुरंग. ४.

परावीया नारी माऊलीसमान मानिलिया धन काय वेंचे. १.
न करितां परनिंदा द्रव्य अभिलाष काय तुमचें यास वेंचे सांगा. २.
बैसलिया ठायीं म्हणतां रामराम काय होय श्रम ऐसें सांगा. ३.
संतांचे वचनीं मानितां विश्वास काय तुमचें यास वेंचे सांगा. ४.
खरें बोलतांना का होती आयास काय वेंचे यास ऐसें सांगा. ५.
तुका म्हणे देव जोडे याचसाठीं आणिक ते आटी नलगे कांहीं. ६.

दुर्जनाची गंधी विष्टेचियेपरी देखोनियां दुरी व्हावें तया. १.
आइका हो तुम्ही मात हे सज्जन करूं संघट्टन नये बोलों. २.
दुर्जनाचें भय धरावें त्यापरी पिसाळलेवरी धांवे श्वान. ३.
दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग बोलिलासे त्याग देशाचा त्या. ४.
तुका म्हणे किती सांगावें पृथक अंग कुंभीपाक दुर्जनांचे. ५.

माकडानें मुठी धरिले फुटाणे गुंतले ते नेणें हात तेथें. १.
काय तो तयाचा लेखावा अन्याय हित नेणें काय आपलें तें. २.
शुकें नळिकेसी गोंवियेले पाय विसरोनी जाय पक्ष दोन्ही. ३.
तुका म्हणे एक ऐसे पशुजीव न चले उपाय कांहीं तेथें. ४.

समुद्र हा पिता बंधु हा चंद्रमा भगिनी ते रमा शंखाचिया. १.
मेहुणा जयाचा द्वारकेचा हरी शंख दारोदारीं भीक मागे. २.
दृष्ट हें जाणावें आपुलें स्वहित तुका म्हणे मात ऐसी आहे. ३.

क्षुधा तृषा कांहीं सर्वथा नावडे पाहायाला धांवे कोल्हाटासी. १.
कथेसी साक्षेपें पाचारिला जरी म्हणे माझ्या घरीं कोणी नाहीं. २.
बलात्कारें जरी आणिला कथेसी निद्रा घे लोडेंसी टेंकूनियां. ३.
तुका म्हणे त्याच्या थुंका तोंडावरी जातो यमपुरी भोगावया. ४.

अर्थेंवीण पाठांतर कां करावें व्यर्थ कां मरावें घोकोनियां. १.
घोकोनियां काय वेगीं अर्थ पाहे अर्थरूप राहे होवोनियां. २.
तुका ह्मणे ज्याला अर्थीं आहे भेटी नाहीं तरी गोष्टी बोलूं नका. ३.

मुसळाचें धनु नव्हे हो सर्वथा पाषाण पिळीतां रस कैंचा. १.
वांझे बाळा जैसें दूध नाहीं स्तनीं गरस त्या आधणीं न शीजती. २.
नवखंड पृथ्वी पिके मृगजळें डोंगर भेटे बळें असमानासी. ३.
नैश्वर देह तैसें तेव्हां होय ब्रह्म तुका म्हणे श्रम करुनी काय. ४.

कायबा करीसी सोंवळें ओंवळें मन नाहीं निर्मळ वाउगेंची. १.
कायबा करीसी पुस्तकाची मोट घोकितां हृदयस्फोट हातां नये. २.
कायबा करीसी टाळ आणि मृदंग जेथें पांडुरंग रंगला नाहीं. ३.
कायबा करीसी ज्ञानाचिया गोष्टी करणी नाहीं पोटीं बोलण्याची. ४.
कायबा करीसी दंभ लौकिकातें हित नाहीं मात तुका म्हणे. ५.

साता दिवसांचा जरी उपवासी तरी कीर्तनासी टाकूं नये. १.
फुटो हा मस्तक तुटो हें शरीर नामाचा गजर सोडूं नये. २.
शरीराचे होत दोन्ही तेही भाग कीर्तनाचा रंग सोडों नये. ३.
तुका म्हणे ऐसा नामीं ज्या निर्धार तेथें निरंतर देव असे. ४.

कोण दिवस येइल कैसा नकळे संपतीचा भरवसा. १.
चौदा चौकडिया लंकापती कोण झाली त्याची गती. २.
लंकेसारखें भुवन त्याचें त्यासी पारखें जाण. ३.
तेतीस कोटी बांदवडी राज्य जातां नलगे घडी. ४.
अहंतेनें हे नाडिले तुका म्हणे वायां गेले. ५.

उपजला प्राणी न राहे संसारीं बैसला शेजारी काळ उसां. १.
पाहा तो उंदीर घेउनि जाय बोका तैसा काळ लोकां नेत असे. २.
खाटिकाचे घरीं अजापुत्र पाहे कसाबाची गाये वांचे कैसी. ३.
तुका म्हणे करा कांहीं काढाकाढी जाती ऐसी घडी पुनः नये. ४.

म्हणे विठ्ठळ पाषाण त्याच्या तोंडावरी वाहाण. १.
नको नको दर्शन त्याचें गलित कुष्ट भरो वाचे. २.
शाळिग्रामा म्हणे धोंडा किडे पडोत त्याच्या तोंडा. ३.
भावी सद्गुरु मनुष्य त्याचें खंडो का आयुष्य. ४.
हरिभक्तांच्या करी चेष्टा त्याचे तोंडीं पडो विष्टा. ५.
तुका म्हणे किती ऐकों कोठवरी मर्यादा राखों. ६.

जुनाट हें धन अंत नाहीं पार खात आलें फार सरलें नाहीं. १.
नारद हा मुनी शुक सनकादिक उरलें अमूप तुम्हां आम्हां. २.
येथूनियां धना खाती बहुत जन वाल गुंज उणें झालें नाहीं. ३.
तुका म्हणे धना नाहीं अंत पार कुंठित हे चार वाचा तेथें. ४.

पाया झाला नारू तेथें बांधिला कापुरू
तेथें बिबव्याचें काम अधमासी तो अधम. १.
रुसला गुलाम धणी करीतो सलाम
तेथें चाकराचें काम अधमासी तो अधम. २.

रुसली घरची दासी धणीण समजावी तीयेसी
तेथें बटकीचें काम अधमासी तो अधम. ३.
देव्हाऱ्यावरी विंचू आला देवपूजा नावडे त्याला
तेथें पैजारेचें काम अधमासी तो अधम. ४.
तुका म्हणे जाती जातीसाठीं खाती माती. ५.

झाली गाढवी दुधाळ महिमा गाईचा पावेल. १.
श्वान झालेंसें चांगलें तरी कां सांगातें जेवील. २.
तुका म्हणे ऐशा जाती काय उंचपण पावती. ३.

पक्षियांच्या घरीं नाहीं सामुगरी त्याची चिंता करी नारायण. १.
अजगर जनावर वारुळांत राहे त्याजकडे पाहे पांडुरंग. २.
चातक हा पक्षी नेघे भूमिजळ त्यासाठीं घननीळ नित्य वर्षे. ३.
तुका म्हणे आम्ही पिपिलिकांची जात पुरवीं मनोरथ पांडुरंगा. ४.

वृद्धपणीं आली जरा शरीर कांपे थरथरा. १.
आयु गेलें हें कळेना स्मरा वेगीं पंढरिराणा. २.
दांतदाढा पडिल्या ओस हनुवटी भेटे नाकास. ३.
हात पाय राहिले कान नेत्रा पाझर हाले मान. ४.
अंगकांती परतली चिरगुटा ऐसी झाली. ५.
आडपडे जिव्हा लोटे शब्द नये मुखावाटे. ६.
तुका म्हणे आतां तरी स्मरा वेगीं हरीहरी. ७.

उपदेश किती करावा खळासी नावडे तयासी बरें कांहीं. १.
शुद्ध कां वासना नव्हे चांडाळाची होळी संचिताची केली तेणें. २.
नाहीं भाव मनीं नाइके वचन आपला आपण उणें घेतो. ३.
तुका म्हणे त्यासी काय व्याली रांड करी बडबड रात्रदिवस. ४.

पापिया चांडाळा हरिकथा नावडे विषयी आवडे गाणें त्याला. १.
ब्राह्मणा दक्षिणा देतां रडे रुका विषयालागीं फुका लुटीतसे. २.
वितभरी लंगोटी नेदी अतिताला खिरम्या देतो शाला भोरप्यासी. ३.
तुका म्हणे त्याच्या थुंका तोंडावरी जातो यमपुरी भोगावया. ४.

गाढव शृंगारिलें कोडें कांहीं केल्या नव्हे घोडें. १.
त्याचें भुंकणें न राहे स्वभावासी करिल काये. २.
श्वान शिबिके बैसविलें भुंकतां न राहे उगलें. ३.
तुका म्हणे स्वभावकर्म कांहीं केल्या न सुटे धर्म. ४.

कावळयाच्या गळां मुक्ताफळमाळा तरी काय त्याला भूषण शोभे. १.
गजालागीं केला कस्तुरीचा लेप तिचें तो स्वरूप काय जाणे. २.
बकापुढें सांगे भावार्थ वचन वाडगाचि शीण होय त्यासी. ३.
तुका म्हणे तैसे अभाविक जन त्यांसी वायां शीण करूं नये. ४.

पायां बांधोनियां दोरी भृंग बांधिला लेंकुरीं. १.
तैसा पावसी बंधन मग सोडवील कोण. २.
गळां बांधोनियां दोरी वानर हिंडवी घरोघरीं. ३.
तुका म्हणे पाहें रीस धापा देत आहे. ४.

मायबापें सांभाळिती लोभाकारणें पाळिती. १.
तैसा नव्हे देवराव त्याचा कृपाळू स्वभाव. २.
मनासारिखें न होतां बाळकासी मारी माता. ३.
तुका म्हणे सांगों किती बाप लेकांस मारिती. ४.

धनें मेळवोनी कोटी सवें नये रे लंगोटी. १.
पानें खाशील उदंड अंतीं जाशिल सुकल्या तोंडें. २.
पलंग न्याहाल्या सुपती शेवटीं गोवऱ्या सांगती. ३.
तुका म्हणे राम एक विसरतां श्रम. ४.

श्रीसमर्थ रामदास स्वामी ह्यांच्या ग्रंथांनीं महाराष्ट्र वाङ्मयास जी भर पडली आहे, ती इतरांच्या कृतींहून कांहीं वेगळ्या प्रकारची आहे. तींत लोकस्थिति मनांत आणून लोकांस पाळितां यावा, अवघड जाऊं नये, असाच बोध त्यांनीं केला आहे. त्यानेंच दासबोध भरला आहे. त्यांतले दोन तीन मासले येथें देणें बरें वाटतें:—

प्रपंचांत वागण्याविषयीं बोधः—

ओव्या.

आळस उदास नागवणा आळस प्रयत्नबुडवणा
आळसें करंटपणाच्या खुणा प्रकट होती. १.
ह्मणोनि आळस नसावा तरीच पाहिजे वैभवा
अत्रीं परत्रीं जीवा समाधान. २.
प्रयत्न करावा तो कोण हेंचि ऐक निरूपण
सावध करूनि अंतःकरण निमिष एक. ३.
प्रातःकाळीं उठावें कांहीं पाठांतर करावें
यथानुशक्ति आठवावें सर्वोत्तमासी. ४.
मुखमार्जन प्रातःस्नान संध्या तर्पण देवतार्चन
पुढें वैश्वदेव उपासन यथासांग. ५.
कांहीं फलाहार घ्यावा मग संसारधंदा करावा
सुशब्दें राजी राखावा सकळ लोक. ६.
ज्याचा जो व्यापार तेथें असावें खबरदार
दुश्चितपणें तरी पोर ओढा लावी. ७.
याकारणें सावधान एकाग्र असावें मन
तरी मग जेवितां भोजन गोड वाटे. ८.
पुढें भोजन झालियावरी कांहीं देवाची चर्चा करी
एकांतीं जाऊन विवरी नाना ग्रंथ. ९.

तरीच प्राणी शहाणा होतो नाहींतरि मूर्खचि रहातो
लोक खाती आपण पहातो दैन्यवाणा. १०.
ऐका सदैवपणाचें लक्षण रिकामा जाऊं नेदी क्षण
प्रपंचव्यवसायाचें ज्ञान बरें पाहे. ११.
कांहीं मेळवी मग जेवी गुंतल्या लोकास उगवी
शरीर कारणीं लावी कांहींतरी. १२.
कांहीं धर्मचर्चा पुराण हरिकथानिरूपण
वाया जाऊं नेदी क्षण दोहींकडे. १३.
ऐसा जो सर्वसावध त्यास कैंचा असेल खेद
विवेकें तुटला संबंध देहबुद्धीचा. १४.
आहे तितुकें देवाचें ऐसें वर्तणें निश्चयाचें
मूळ तुटलें उद्वेगाचें येणें रीती. १५.
प्रपंचीं पाहिजे सुवर्ण परमार्थी पंचीकरण
महावाक्याचें विवरण करितां सुटे. १६.

समाधानें समाधान वाढे मैत्रीनें मैत्री जडे
सोडितां क्षणमात्रें मोडे बरेपण. १.
अहो कांहो अरे कांरे जनीं ऐकिजे कीरे
कळत असतांच कांरे निकामीपणें. २.
तनें मनें झिजवावें तेणें भलें म्हणोनि घ्यावें
उगेंच कल्पितां शिणावें वाउगें जनीं. ३.
म्हणूनि दुसऱ्यास सुखी करावें तेणें आपण सुखी व्हावें
दुसऱ्यास कष्टवितां कष्टावें लागेल स्वयें. ४.
आळसें कार्यभाग नासतो साक्षेपें होत होत होतो
दिसती गोष्टी कळेना तो शाहाणा कैसा. ५.
• • बहुतांचे मुखीं उरावें बहुतांचे अंतरीं भरावें
उत्तम गुणीं विवरावें प्राणिमात्रासी. ६.

शाहाणे करावे जन पतित करावे पावन
सृष्टीमध्यें भगवद्भजन वाढवावें. ७.

ओळखीनें ओळखी साधावी बुद्धीनें बुद्धि बोधावी
नित्य न्यायें वाट रोधावी पाखंडियाची. १.
वेष धरावा बावळा अंतरीं असाव्या नाना कळा
सगट लोकांचा जिव्हाळा मोडूंच नये. २.
एके ठायीं बसोनि राहिला तरी मग व्यापचि बुडाला
सावधपणें ज्याला त्याला भेटी द्यावी. ३.

उदंडांचें उदंड ऐकावें परी तें प्रत्ययें पाहावें
खरें खोटें निवडावें अंतर्यामीं. १.
वेडे करावे शहाणे तरीच जिणें श्लाघ्यवाणें
उगेंच वादांग वाढविणें हें मूर्खपण. २.
जो दुसऱ्याच्या हितावरी तो विपट कांहींच न करी
मानत मानत विवरी अंतर तयाचें ३.
धक्के चपेटे सोसावे नीच शब्द सोशीत जावे
पस्तवोनि परावे आपुले होती. ४.
प्रसंग जाणोनि बोलावें जाणपण कांहींच न घ्यावें
लीनता धरूनि जावें जेथें तेथें. ५.

कष्टेंविण फळ नाहीं कष्टेंविण राज्य नाहीं
केल्याविण होत नाहीं साध्य जनीं. १.
आळसें काम नासतें हें तो प्रत्ययास येतें
कष्टाकडे चुकवितें हीन जनीं. २.
आधीं कष्टाचें दुःख सोशिती ते सुखाचें फळ भोगिती
आधीं आळसें सुखावती त्यांसि पुढें दुःख. ३.

जिहीं उदंड कष्ट केले ते भाग्य भोगोनि गेले
येर ते बोलतचि राहिले करंटे जन. ४.
विचारें इहलोक परलोक विचारें होतसे सार्थक
विचारें नित्यानित्यविवेक पाहिला पाहिजे. ५.

जितकें कांहीं आपणासि ठावें तितकें हळूहळू शिकवावें
शाहाणे करून सोडावें बहुत जनीं. १.
होईल तें आपण करावें न होतां जनां करवावें
भगवद्भजनेंवीण राहावें हा धर्म नव्हे. २.
आपण करावें करवावें आपण विवरावें विवरवावें
आपण धरावें धरवावें भजनमार्गासी. ३.
उपाधींत सांपडूं नये उपाधीस कंटाळूं नये
निःसंगपणा कामा नये कोणाएकाविषयीं. ४.
व्याप होईल तों राहावें व्याप सहातां उठोनि जावें
आनंदरूप फिरावें कोठें तरी. ५.
कीर्ति पाहातां सुख नाहीं सुख पाहतां कीर्ति नाहीं
केल्यावीण कांहींच नाहीं कोठेंतरी. ६.

कोणाचा भरंवसा न धरावा आपुला आपण विचार पाहावा
तकवा उदंड धरावा हाही एक विषयीं. १.
देहदुःखें कदरों नये उदंडचि करावे उपाय
मग सर्व सुखासी काय उणें आहे. २.
एकांतीं चाळणा करावी धारणा उदंड धरावी
नानाविचारणा करावी अरिमित्रांची. ३.
प्रयत्नीं चुकों नये सुखवासी कामा नये
सुचावे नाना उपाय अनेक विषयीं. ४.

उपाधीस कंटाळला विचाराचा आळस आला
म्हणजे जाणावा वेंचला बुद्धीपासोनी. ५.
जेथें बहु विचार तेथें ईश्वर अवतार
मागें गेले थोर थोर धके चपेटे सोसोनी. ६.
आपल्या मनासी रोधावें परांतर शोधावें
क्षणक्षणा सांभाळावें बदलेल म्हणोनी. ७.

## श्लोक.

अती लीनता सर्व भावें स्वभावें जना सज्जनालागिं संतोषवावें
देहे कारणीं सर्व लावीत जावें सगूणे अती आदरेंसी भजावें. १.
विवेकें क्रिया आपुली पालटावी अती आदरें शुद्ध क्रीया धरावी
जगीं बोलण्यासारखें चाल बापा मनीं कल्पना सोड संसारतापा २.
तुटे वाद संवाद तेथें करावा विवेकें अहंभाव हा पालटावा
जनीं बोलण्यासारखें आचरावें क्रिया पालटे शुद्ध पंथेंचि जावें. ३.
सदा बोलण्यासारखें चालताहे अनेकीं सदा एक देवासि पाहे
सगूणीं भजे लेश नाहीं भ्रमाचा जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ४.
सदा आर्जवी प्रीय जो सर्व लोकीं सदा सर्वदा सत्यवादी विवेकी.
न बोले कदा मिथ्य वाचा त्रिवाचा जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा५.
दिनाचा दयाळू मनाचा मवाळू स्नेहाळू कृपाळू जगीं दास पाळू
जया अंतरीं क्रोध संताप कैंचा जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ६.

## पद.

ज्या ज्या वेळे जें जें होइल तें तें भोगावें
विवेकाला विसरुनि आपण कष्टी कां व्हावें. ध्रु०.
एकदा एक वेळ बहु सुखाची गेली
एकदा एक वेळ जीवा बहु पीडा झाली. ध्रु० ज्या ज्या. १.
एकदा मागूं जातां मिळती षड्रस पक्वान्नें
एकदा मागूं जातां न मिळे भाजीचें पान. ध्रु० ज्या ज्या. २.

सुकृत दुष्कृत दोन्ही पूर्वदत्ताचें फळ
ऐसें प्राणी जाणेना तो मूर्खेचि केवळ. ध्रु० ज्या ज्या. ३.
देहदुःखास मूळ ऐसें बरवें जाणून
सुखदुःखाविरहित रामदास आपण. ध्रु० ज्या ज्या. ४.

## ओव्या.

लहान थोर काम कांहीं केल्यावीण होत नाहीं
करंव्या सावध पाहीं सदैव होसी. १.
म्हणोनि आळस सोडावा यत्न साक्षेपें जोडावा
दुश्चित्तपणा मोडावा थाराबळें. २.
प्रातःकाळीं उठत जावें प्रातःस्मरण करावें
नित्यनेमें स्मरावें पाठांतर. ३.
सावधानता असावी नीतिमर्यादा राखावी
जनास म्हणे अशी करावी क्रिया शुद्ध. ४.
बहुतांचें समाधान राखावें बहुतांस मानेल तें करावें
विलग पडों नचि द्यावें कथेमध्यें. ५.

आधीं मनुष्य ओळखावे योग्य पाहोनि काम सांगावें
निकामी तरी ठेवावें एकीकडे. १.
अमर्याद फितवेखोर यांचा करावा संहार
शोधिला पाहिजे विचार यथातथ्य. २.
मनुष्य राजी राखणें हींच भाग्याचीं लक्षणें
कठिणपणें दुरी धरणें कांहीं एक. ३.
समर्थीं मनुष्य कामा येतें तयालागीं सोशिजेतें
न्याय सांडितां मग तें सहजचि खोटें. ४.
न्यायसीमा उल्लंघूं नये उल्लंघितां होतो अपाय
न्याय नसतां उपाय होईल कैंचा. ५.

उपाधीस जो कंटाळला तो भाग्यापासून चेवला
समयीं धीर सांडिला तोही खोटा. ६.

संकटीं कंटाळों नये करावे अत्यंत उपाय
तरी मग पाहतां काय उणें आहे. ७.

राजांनीं करावे राजधर्म क्षत्रीं करावे क्षात्रधर्म
ब्राह्मणीं करावें स्वकर्म नानाप्रकारें. ८.

ऐहिक वस्तूविषयांचें ज्ञान तें ज्ञान नव्हेः—

भूत भविष्य वर्तमान ठाउकें आहे परिच्छिन्न
त्यासीच ह्मणिजेलें ज्ञान परी तें ज्ञान नव्हे. १.

बहुत केलें विद्यापठन संगीत शास्त्र रागज्ञान
वैदिक शास्त्र वेदाध्ययन हेंही ज्ञान नव्हे. २.

नाना व्यवसायांचें ज्ञान नाना दीक्षेचें ज्ञान
नाना परीक्षेचें ज्ञान हें ज्ञान नव्हे. ३.

नाना अश्वांची परीक्षा नाना गजांची परीक्षा
नाना श्वापदांची परीक्षा हें ज्ञान नव्हे. ४.

नाना पशूंची परीक्षा नाना पक्ष्यांची परीक्षा
नाना भूतांची परीक्षा हें ज्ञान नव्हे. ५.

नाना पानांची परीक्षा नाना वस्त्रांची परीक्षा
नाना शस्त्रांची परीक्षा हें ज्ञान नव्हे. ६.

नाना धातूंची परीक्षा नाना नाण्यांची परीक्षा
नाना रत्नांची परीक्षा हें ज्ञान नव्हे. ७.

नाना पाषाणपरीक्षा नाना काष्ठांची परीक्षा
नाना वाद्यांची परीक्षा हें ज्ञान नव्हे. ८.

नाना रसांची परीक्षा नाना बीजांची परीक्षा
नाना अंकुरपरीक्षा हें ज्ञान नव्हे. ९.

नाना पुष्पांची परीक्षा नाना फळांची परीक्षा
नाना वल्लींची परीक्षा हें ज्ञान नव्हे. १०.

नाना विद्यांची परीक्षा नाना कळांची परीक्षा
नाना चातुर्यपरीक्षा हें ज्ञान नव्हे. ११.

नाना शब्दांची परीक्षा नाना अर्थांची परीक्षा
नाना भाषांची परीक्षा हें ज्ञान नव्हे. १२.

नाना मतांची परीक्षा नाना ज्ञानांची परीक्षा
नाना वृत्तींची परीक्षा हें ज्ञान नव्हे. १३.

नेमकेंचि बोलणें तत्काळचि प्रतिवचन देणें
शीघ्रचि कवित्व करणें हें ज्ञान नव्हे. १४.

काव्य कुशळ संगीत कळा गीतप्रबंध नृत्यकळा
सभाचातुर्य शब्दकळा हें ज्ञान नव्हे. १५.

नाना लाघवें चित्रकळा नाना वाद्यें संगीत कळा
नानाप्रकारें विचित्र कळा हें ज्ञान नव्हे. १६.

आदिकरून चौसष्ट कळा यांहीं वेगळया नानाकळा
चौदा विद्या सिद्धी कळा हें ज्ञान नव्हे. १७.

आध्यात्मिक जें ज्ञान, तें खरें ज्ञानः—

मुख्य देवास जाणावें सत्यस्वरूप ओळखावें
नित्यानित्य विचारावें या नांव ज्ञान. १.

जेथें दृश्य प्रकृति सरे पांच भौतिक हें वोसरे.
समूळ द्वैत निवारे या नांव ज्ञान. २.

मनोबुद्धि अगोचर न चले तर्काचा विचार
उल्लेख परेहून पर या नांव ज्ञान. ३.

दृश्य पदार्थ जाणिजे त्यास पदार्थज्ञान बोलिजे
शुद्धस्वरूप जाणिजे या नांव स्वरूपज्ञान. ४.

जें या चराचराचें मूळ शुद्ध स्वरूप निर्मळ.
या नांव ज्ञान केवळ वेदांत मतें. ५.

शोधितां आपुलें मूळस्थान सहजचि उडे अज्ञान.
या नांवें म्हणिजे ब्रह्मज्ञान मोक्षदायक. ६.

सकळ साधनांचें फळ ज्ञानचि सांगे केवळ
जेणें संशयाचें मूळ निःशेष तुटे. ७.
शिष्या एकांतीं बैसावें स्वरूपीं विश्रांतीस जावें
तेणें गुणें दृढ व्हावें परमार्थीं सदा. ८.

देवाशीं सख्य कसें जोडावें ?

भक्तिभाव आणि भजन निरूपण आणि कथाकीर्तन
प्रेमळ भक्तांचें गायन आवडे देवा. १.
आपण तैसेंचि वर्तावें आपणासि तेंच आवडावें
मनासारिखें होतांचि स्वभावें सख्य घडे नेमस्त. २.
देवाच्या सख्यत्वाकारणें आपुलें सौख्य सोडोनि देणें
अनन्य भावें जीवें प्राणें शरीर तेंहि वेंचावें. ३.
देवाच्या सख्यत्वासाठीं पाडाव्या जिवलगांसि तुटी
सर्व अर्पावें शेवटीं प्राण तोहि वेचावा. ४.
आपुलें अवघेंचि जावें परी देवासि सख्य रहावें
ऐसी प्रीती जीवें भावें भगवंतीं लागावी. ५.
सखा मानावा भगवंत मातापिता गणगोत
विद्या लक्ष्मी धनवित्त सकळहि परमात्मा ६.
देवाचें जें मनोगत तेंचि आपुलें हित निश्चित
इच्छेसाठीं भगवंत अंतरूं नये कीं. ७.
देवाचे इच्छेनें वर्तावें देव करील तें मानावें
मग सहजचि भावें कृपाळु देव. ८.
पाहतां देवाचे कृपेसी मातेची कृपा कायसी
माता वधी बाळकासी विपत्तिकाळीं ९.
देवें भक्त कोण वधिला कधीं देखिला ना ऐकिला
शरणागतासि देव झाला वज्रपंजरू. १०.
देव भक्तांचा कैवारी देव पतितासि तारी
देव होय सहाकारी अनाथांचा. ११.

नीतिबोध करणें हा सगळ्या वाङ्मयाचा मुख्य हेतु असला पाहिजे, असें वामनपंडितांस फार वाटत होतें. आणि ह्याकरितां त्यांनीं जितके परिश्रम केले आहेत, तितके कोणाही दुसऱ्या कवीनें केलेले आढळत नाहींत. त्यांचीं शतकें तर आहेतच. शिवाय स्फुटांतही ह्याविषयीं त्यांचा कटाक्ष फार दिसतो.

**श्लोक.**

जो न गाय हरिचे महिमेला
तो असोनि जित या महिं मेला
ऐसियासि यम केंवि न जाची
मूर्ति इष्ट न जयासि अजाची[1]. १.

ईश्वरें तुज दिली नरकाया
साधनें करिसि तूं नरका या
भोगिशी निशिदिनीं विषयातें
मानिशी न मनिं तूं विष यातें. २.

गाओनियां मधुर हें हरिनाम नाचा
पाहों मग श्रम कसा हरिना मनाचा
तत्रापि कीर्तनचि मुख्य कलौ करीतो
होतो तया प्रगट तारक लौकरी तो. ३.

न गर्जती जे हरि गाढ[2] वाचे
ते पापरूपी नर गाढवाचे
न आतळावें[3] अजि त्यांस वातें
ज्यांच्या मनीं वास न केशवातें. ४.

कलियुग चवथें हें दोषसिंधूच सारीं[4]
सकलहि नरकाच्या साधनांचा पसारा

---

१ देवाची. २ मोठ्या. ३ शिवावें. ४ सगळा.

परि हरिगुणलीला सत्कथा यांत सारी
त्यजुनि सकळ धंदा कीर्तनीं काळ सारा. ५.

कुऱ्हाडीच्या घायाप्रति तरु जसा का तुटतसे
अहो आयुष्याचे दिनरजनिघायें स्फुट तसे
न देहाची ऐशा वयें समजतां ऊर उलतो
तया साधे ऐसा कुनर विषयातेंच भुलतो. ६.

अहाहा चौऱ्याशीं क्रमुनि मनुजा सुंदर कशी
तनू हे श्रीरामें दिधलि भजनालागुनि अशी
तितें कैसें मूर्खा क्षणिक विषयाधीन करिशी
अनर्घ्या रत्नातें त्यजुनि करिं गारेसि धरिसी. ७.

बुडो हे धरा कीं लया विश्व जावो
पडो काळहस्तें शिरीं वज्रघावो
विसंबेंचि ना सर्वथा नाममाळा
मुखीं रामचंद्र स्मरा वेळवेळां. ८.

नका याग मांडूं नका प्राण कोंडूं
नका द्रव्य दारा घरें भोग सोडूं
नका कष्टुनी पर्वताग्रीं तपाला
मुखीं रामचंद्र स्मरा वेळवेळां. ९.

अहो येतां जातां बसत उठतां कार्य करितां
सदा देतां घेतां वदनिं वदतां ग्रास गिळितां
घरीं दारीं शय्येवरि रतिसुखाचे अवसरीं
समस्तांची लज्जा त्यजुनि भगवच्चिंतन करीं. १०.

**वामनपंडित.**

ह्यांत सर्व कांहीं आलें आहे. तरी आमच्या वाङ्मयांत गीतेसारखा नीतिपर दुसरा ग्रंथ नाहीं, हें मनांत आणून वामनांनीं प्रथम तिचें

१ श्रेष्ठ. २ मर्यादा.

समश्लोकी प्राकृत भाषांतर केलें. तें चांगलें उतरलें आहे. अगदीं बरोबर मूळासारखें आहे. ती समश्लोकी निर्विघ्नपणें शेवटास गेली, तेव्हां त्यांनीं आनंदभरानें म्हटलें आहेः—

**श्लोक.**

माता धन्य पिता धन्य धन्य धन्य सुहृत्सखे
केले गीतार्थ गूढार्थ हृदयांत प्रकाशित.

तरी, पंडितांस असें पुनः वाटलें कीं, त्या महातत्वग्रंथाचा बोध तेवढ्यानें बरोबर होणार नाहीं, म्हणून त्यांनीं **यथार्थदीपिका** म्हणून एक मोठा ओवीबद्ध ग्रंथ त्याच विषयावर केला. त्यांत बावीस हजारांपेक्षां अधिक ओंव्या आहेत. त्याची आणि पहिल्या समश्लोकीची तुळना करून पाहिली म्हणजे, गीतेचें रहस्य लोकांच्या अंतःकरणांत भरविण्याविषयीं पंडितांचा केवढा हेतु होता, तो उत्तम प्रकारें व्यक्त होतो.

**मूळ श्लोक**—हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं
जित्वा वा भोक्ष्यसे महीम्
तस्मादुत्तिष्ठ कौंतेय
युद्धाय कृतनिश्चयः

**समश्लोकी**—मेलिया पावसी स्वर्ग
जिंकिल्या राज्य भोगिसी
यालागीं ऊठ कौंतेया
करूनी युद्धनिश्चया.

**यथार्थदीपिकाः**—

मरशील हें तों न घडे कीं मी आहें तुजकडे
अथवा रणीं मस्तक पडे तरी पावसी तूं स्वर्ग. १.

अथवा न मरतांच जया पावशील तूं धनंजया
तरी पृथ्वी भोगिशी संदेह या गोष्टीस काय. २.

या दोन्ही कारणांवरी दृष्टि देवोनियां बरी
कौंतेया ऊठ झडकरी करूनियां युद्धनिश्चय. ३.

कुंतीची लेंकी असती ते वेडेपणें रुसती बैसती
तरी आम्ही तीप्रती कां ऊठ म्हणतों. ४.

तूं तो अगा कौंतेय कन्या नव्हेसि तिचा तनय
म्हणोनि म्हणतों युद्धनिश्चय करून ऊठ हें भाव. ५.

गेला या गोष्टीनें भ्रम युद्धही वाटे स्वधर्म
परी म्हणे जाणावें ब्रह्म कर्म बंधक अनिवार. ६.

जितां राज्य मेल्या स्वर्ग दोन्ही बंधांचे उपसर्ग
अंतीं कर्मफलवर्ग दुःखहेतु. ७.

दुःख तितुकें पाप स्वर्गीं शेवटीं तरी ताप
युद्ध स्वधर्म तरी पश्चात्ताप फल बंधरूपें देणारा. ८.

हा अर्जुनाचा भाव जाणोनि सर्वसाक्षी देव
याचा परिहार देवाधिदेव यापुढें आतां बोलेल. ९.

कीं होऊनि निरहंकार जय अपजय दोन्ही प्रकार
सम मानी तरी हा निर्धार कीं पाप तैसें न पावसी. १०.

पाप तैसें न पावसी या श्लोकीं म्हणेल अर्जुनासी
हें मारितां स्वजनासी पाप होणार तें पाप म्हणवेना. ११.

पाप वाटतें जरी स्वधर्म त्यास येथवरी
न म्हणतां सर्वथा हरी स्वजनहत्येसी. १२.

स्वधर्म कां टाकिसी वारंवार गोष्टी ऐसी
जो बोले तो कैसी पापवार्ता बोलेल. १३.

हें पाप म्हणोनी बोलेल जेव्हां अंगीकारूनी
तेव्हां या अध्यायाच्या आरंभापासूनी जें बोलला तें व्यर्थ. १४.
स्वजनहत्या ही स्वधर्म क्षत्रियांस परी हेंही कर्म
बंध करणार हेंचि वर्म पापशब्दें ये स्थळीं. १५.
बंधकर्मांचें नाम पाप म्हणती निगमागम
त्याचा परिहार पुरुषोत्तम बोलेल आतां. १६.
कीं सुखदुःखीं सम होऊनी करा हा स्वधर्म
ऐसें पार्थास सगुण ब्रह्म बोलेल आतां या श्लोकीं. १७.

दुसरें एक उदाहरण.

मूळश्लोक—व्यवसायात्मिका बुद्धि-
रेकेह कुरुनंदन
बहुशाखा ह्यनंताश्च
बुद्धयो व्यवसायिनाम्.

समश्लोकी—निश्चयाची बुद्धि एक
या मार्गीं कुरुनंदना
बहु शाखा अशा बुद्धी
अनंता कामुकाचिया.

यथार्थदीपिका—अगा हे कुरुनंदना कौरवकुळाच्या मंडना
धन्य कीं तूं या भवखंडना मोक्षमार्गास आइकसी. १.
एक सर्वेश्वर कृपा करील या निश्चयरूपा
बुद्धि पावे हा मार्ग सोपा आणीक तैसा असेना. २.
एका ईश्वराचे चरण त्यास एकनिष्ठ असणें शरण
त्या कारणेंचि कर्म करणें अन्य नलगे. ३.
हें एक बुद्धीचें लक्षण आतां तिचें निश्चयात्मिकपण
हें कीं निश्चित आपण या भवसमुद्रीं बुडेना. ४.

तैशी निश्चयात्मिका बुद्धि गा कुरुकुळाच्या तिलका
सुखहेतु न मनीं एका ईश्वराविण. ५.

न जया हा एक निश्चय त्याच्या बुद्धीचे आशय
अनंत आणि नाना काममय फांटे तया आशयाचे. ६.

एका एका मनोरथासाठीं यत्न करिती कोटि कोटी
मागुती निश्चय पोटीं कार्यसिद्धीचा असेना. ७.

होईल ही नव्हे फळ या चिंतनेनें तळमळ
कधीं होईल हे हळहळ सुख कैसें तयातें. ८.

एक निश्चय नसे जया त्याची बुद्धि साह्य न तया
पीडी ऐशी धनंजया अनंत शाखा होउनी. ९.

आतां यापुढें श्लोक तो कोण्या निमित्तें उत्तमश्लोक
बोलेल हें निष्काम लोक परिसोत. १०.

अर्जुन म्हणे मनीं कीं काम्य वाईट म्हणोनी
का निंदितो जें महाजनीं श्लाघ्य केलें. ११.

जें जें वेदप्रमाण बोलती चतुर सुजाण
वेदशास्त्रप्रवीण तें निंद्य कैसें. १२.

हा अर्जुनमनोभाव जाणे सर्वसाक्षी देव
तो पुसे तों स्वयमेव बोलतसे हा श्लोक. १३.

आमच्या एकंदर सगळ्या महाराष्ट्रकविमंडळांत मोरोपंतांच्या इतकी मराठी भाषा कोणाच्याही स्वाधीन नव्हती. ती केवळ त्यांची दासी होऊन राहिली होती, असें दिसतें. तिला त्यांनीं जशी पाहिजे तशी राबविली आहे. तिचे जितके चमत्कार त्यांनीं आपल्या काव्यांत करून दाखविले आहेत, तितके दुसऱ्या कोणत्याही कवीस करितां आले नाहींत. ते त्यांनीं कांहीं थोडथोडके केले नां-

हींत. पुष्कळ केले आहेत. ह्यावरून असें दिसतें कीं, ते रचण्यास त्यांस मुळींच आवंकावें लागत नसे. त्यांतले दोन चार येथें मासल्या-करितां सांगतों.

मोरोपंतांच्या भक्तीविषयीं कोणी कांहीं म्हणोत, परंतु, त्यांनीं रामकथा १०८ वेळां वेगळ्या वेगळ्या प्रकारांनीं गाऊन १०८ रामायणें रचिलीं, ह्यांत त्यांच्या मनाचा ओढा भक्तीशिवाय दुसऱ्या कोणीकडेही नव्हता, हें कबूल करणें भाग आहे. ह्या रामायणांनीं त्यांची भक्ति व्यक्त होऊन, शिवाय भाषानैपुण्य प्रगट होतें, तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ह्या रामायणांत मंत्ररामायणें दोन आहेत. एक **बालमंत्ररामायण** आणि दुसरें **मंत्ररामायण**. प्रत्ये-कांत सात सात कांडें आहेत. १ बालकांड, २ अयोध्याकांड, ३ अरण्यकांड, ४ किष्किंधाकांड, ५ सुंदरकांड, ६ युद्धकांड, आणि ७ उत्तरकांड. ह्यांतल्या कांडांचे क्रमांक आणि कांडांतल्या आर्यांच्या पूर्वार्धांतल्या अक्षरांचे क्रमांक ह्यांचा मेळ साधिला आहे. तो फार विलक्षण आहे. हें उदाहरणांनीं लवकर कळेल. ह्यांत **"श्रीराम जयराम जय जय राम"** हा मंत्र साधलेला आहे. ह्यांत तेरा अक्षरें आहेत. ह्यांच्या साधनार्थ तेरा आर्या कराव्या लागल्या आहेत. ह्यांमध्यें बालकांड पहिलें आहे. म्हणून हा मंत्र पहिल्या अक्षरांत साधून दाखविला आहे. ह्यांतल्या अक्षरपंक्तीवरून कांड सांगतां येतें, तशी कांडावरून अक्षरपंक्ति सांगतां येते.

हें असें कसें आहे तें पहाः—

पहिलें बालकांड आहे. त्यांतल्या आर्यांतल्या पूर्वार्धाच्या पहिल्या पहिल्या अक्षरांत पूर्वोक्त मंत्र साधला आहे. त्याप्रमाणें पांचवें

सुंदरकांड आहे. ह्यांतल्या आर्यांच्या पूर्वार्धांतील पांचव्या पांचव्या अक्षरांत हा मंत्र साधला आहे. ह्या दोहोंचीं उदाहरणें देतोंः—

प्रथम उदाहरण बालकांडाचेंः—

## आर्या.

श्रीसूर्यवंशमणि तो करि पुत्रांचीं यथोक्त उपनयनें[1]
संतत अतृप्त चित्तें सेवी तन्मुख[2] रुचीस नृप नयनें. १.

राक्षस-पीडा-व्याजें[3] कौशिक मागोनि दशरथाजवळी
हृदयीं रामाभिधनिजपुण्यफळातें महासुखें कवळी. २.

मह्यमर[4] बलाबतिला[5] विद्या दे क्षुत्तृषार्ति[6]-हरणार्थ
अर्पी धनुःश्रुतीतें[7] सज्जनरक्षार्थ दुष्टमरणार्थ. ३.

जन्य[8] कराया रोधी मुनिच्या मार्गासि ताटका चंडी
विश्वामित्रनिदेशें तीस वधी सर्वलोककोदंडी. ४.

यश जोडाया जाउनि सानुज विभु आश्रमास यज्ञाचें.
त्राण करी असुरवधें मन सुखवी मंत्रसर्व[9]यज्ञाचें. ५.

राजा जनक मुनीतें स्वक्रतु[10]सिद्ध्यर्थ धाडुनी मंत्री
‘दर्शन देउनि मातें धन्य करावें’ ह्मणोनि आमंत्री. ६.

मर्त्याकृतिला विभुला नेतां मार्गीं कथी परावृत्ता[11]
चरणें गौतमजाया उद्धरवी कामसुखपरावृत्ता. ७.

जनकपुरा मग जाउनि भंगुनि भवचापदंड बाळपणीं
कौशिकमुनिप्रसादें जिंकी रघुवीर जानकीस पणीं. ८.

---

१ मुंजी. २ त्याच्या मुखशोभेस. ३ राक्षसपीडेच्या मिषानें. ४ ब्राह्मण. ५ बलाबतिला नांवाची. ६ भूकतहान हीं नाहींशी करण्यास. ७ धनुर्विद्येतें. ८ युद्ध. ९ मंत्रसमूहज्ञ विश्वामित्राचें. १० यज्ञ. ११ मागें घडलेली.

यतचित्तें त्या जनकें धाडुनि शिबिकारथेभवाहांतें[1]
दशरथ पूर्णमनोरथ सांतःपुर आणिला विवाहातें. ९

जनपदजन तेव्हां बहु मिळते झाले कवि प्रभूपमर्यी[2]
गंधर्व यक्ष चारण किन्नर सुरलोकविप्र भूप यमी. १०.

येंव्हा[3] जनक स्वौरस कन्या जे ऊर्मिला तिचा पाणी
लक्ष्मणवीराकरवीं धरवी तें लोक फार वाखाणी. ११.

राजाचा अनुजन्मा कुशध्वजाख्य प्रसिद्ध तो कन्या
श्रुतकीर्ति रिपुघ्नाला दे भरतालाहि मांडवी धन्या. १२.

महदुत्सवें विवाहीं अर्पी नृप जांवयासि नगराशी[4]
पूजुनि पंक्तिरथातें[5] आज्ञा दे जावयासि नगराशी. १३.

आतां दुसरें उदाहरण **सुंदरकांडाचें** देऊं. हें कांड पांचवें आहे. म्हणून ह्याच्या रचनेंत पूर्वार्धाचें पांचवें अक्षर साधून हा मंत्र रचिला आहे.

## आर्या.

मतिवीर्य[6] श्री भाजन मारुति जेव्हां उडे तदा शिखरी[7]
स्वशिरोभंगें भावी-दशमुखगति दाखवी तयाशि खरी. १.

तों सलिलें रा शिवाक्यें[8] प्रगटे शिवदारबंधु तो, यातें
विश्राम द्यावयाला, यक्षें भेदूनि सिंधुतोयातें. २.

वक्षःस्थलें म रुत्सुत पाडी मानूनि विघ्नशंकेला
मैनाकासि गमे कीं इंद्रें वज्रप्रहार हा केला. ३.

'घेऊनि आं ज नेया! विश्राम पुनः प्रयाण योजावें
अब्धिप्रेषितहिमवत्सुत[10] आप्त असें मनांत समजावें'. ४.

---

१ पालखी, रथ, हत्ती, घोडे, यांतें. २ रामलक्ष्मी. ३ यज्ञकर्ता. ४ दागिन्यांच्या राशी. ५ दशरथातें. ६ बुद्धि, पराक्रम व संपत्ति यांचें पात्र. ७ पर्वत. ८ समुद्रवाक्यें. ९ मैनाक. १० समुद्रानें धाडलेला हिमालयपुत्र मैनाक.

हें आंजने य ऐकुनि, सन्मानुनि तोषवूनि मैनाका.<br>
गेला तसाचि चापच्युतशरसा; तुष्टि होय तैं नाका. ५.

परम त्व रा करुनियां जाय महाकाय दीर्घलांगूल<br>
दशयोजनतनु कपि तो स्वजवें[1]चि करी पित्यासि पांगूळ. ६.

धृतपक्ष मं[2] हीध्रतसा गरुडानिल वेगवान् महाकाय<br>
जातो काल दशानन[3]नगरग्रासैककाम हा काय. ७.

तों नागांची जननी, सुरसा सुरसाध्य सिद्ध[4]गणलपितें<br>
वीर्यपरीक्षेसाठीं विघ्न करी सागरीं महाकपितें. ८.

आनन आं[5] य त केलें तत्संख्या वीस योजनें अ[6]शिती<br>
असितीक्ष्[7]ण दंत दंष्ट्रा सुरसा व्यापी नभोंतरा अशिती. ९.

रोधूनि अं ज नीच्या तनयाचा सर्व मार्ग ते अतुला<br>
'विधिवरदान असे मज, भक्षीन' ह्मणे 'बळेंच आज तुला'.

मारुति न य निपुण तिला स्वकथा सांगे ह्मणे, 'धरादुहिता<br>
दशवदनानें नेली केली दुष्टें मनःप्रियें रहिता. ११.

दशरथ रा ज सुतातें, केलें संतप्त बहु वियोगानें<br>
शोधावया सतीतें जातों तद्दूत तन्नियोगा[8]नें. १२.

करुनि न म स्कार तिला जाउनि सांगेन राघवाला हें<br>
मग येईन तदा तूं मज भक्षुनि काम आघवा[9] लाहें. १३.

भारताचीं एकंदर पर्वें अठरा. १ आदिपर्व, २ सभापर्व, ३ वनपर्व, ४ विराटपर्व, ५ उद्योगपर्व, ६ भीष्मपर्व, ७ द्रोणपर्व, ८ कर्णपर्व, ९ शल्यपर्व, १० गदापर्व, ११ सौप्तिकपर्व, १२ ऐषिकपर्व, १३ विशोकपर्व, १४ स्त्रीपर्व, १५ शांतिपर्व, १६ अश्वमेधपर्व, १७

---

१ आपल्या वेगानें. २ पर्वत. ३ रावणनगरी गिळण्याची आहे इच्छा ज्यास. ४ देवादिकांच्या भाषणानें. ५ दीर्घ. ६ ऐशीं. ७ तरवारीसारखे तीक्ष्ण आहेत दांत व दाढा जिच्या. ८ त्याच्या आज्ञेनें. ९ सर्व.

आश्रमवासिकपर्व, आणि १८ स्वर्गारोहणपर्व. हीं सगळीं पंतांनीं आर्याबद्ध लिहिलीं आहेत. ह्या पर्वांतल्या प्रत्येकीं पहिल्या पहिल्या आर्येचें पहिलें पहिलें अक्षर घेतलें म्हणजे **"श्रीपांडवसहायो भगवानरविंदाक्षो जयति"** असें अठरा अक्षरांचें संस्कृतवाक्य उत्पन्न होतें. म्हणजे, अमक्या पर्वाच्या पहिल्या आर्येचें पहिलें अक्षर अमकें असें नेमकें सांगतां येतें, किंवा पर्वाची पहिली आर्या म्हटल्याबरोबर तिच्या पहिल्या अक्षरावरून हें अमुक पर्व असें सांगतां येतें. उदाहरणः—

**सरसिजनाभ सभेंत द्रुपदविराटादि निजजनांसहित**
**बैसुनि मनीं विचारी द्याया साधूनि निजजनांस हित.**

हींत **स** हें प्रथमाक्षर आहे. तेव्हां ही आर्या पंचम पर्वाची म्हणजे उद्योगपर्वाची पहिली आहे; कां कीं उद्योग हें पांचवें आहे. त्याप्रमाणेंचः—

**गरुडध्वजचरणाश्रितचरितश्रवण त्रिताप संहरितें**
**भगवत्प्रेम वसाया करितें हृदयासि पिटुनि अंह रितें.**

ही आर्या नवव्या पर्वाची म्हणजे शल्यपर्वाची पहिली असली पाहिजे, कां कीं, पूर्वोक्त संस्कृत वाक्यांत **ग** हें अक्षर नववें आहे.

कौरवांनीं दिलेला ताप धर्मराजा शांतपणें सोशीत आहे, असें पाहून किंचित् विस्मयानें कुंतीनें म्हटलें:—

## आर्यार्ध.

**वाटे सुभटें पुत्रें मेळविला विप्रसेवनीं नव ट.**

मला वाटतें कीं सुभट म्हणजे चांगला योद्धा जो पुत्र धर्म त्यानें ब्राह्मणांची सेवा करून एक नवा **ट** मिळविला. म्हणजे, तो भट

होता तो भट्ट झाला, चांगला योद्धा होता, तो चांगला भिक्षुक ब्राह्मण झाला. ह्यावरून कुंती चांगली मर्मज्ञ सुशिक्षित होती, असें झालें.

कुंतीशीं बोलतांना कर्ण आपणास **राधेय** म्हणत असे, तें तिला सहन न होऊन, तिनें त्याला म्हटलें:—

**आर्यार्ध.**

**राधे यथेच्छ म्हण परि कर्णा कर्णासि फार बाधे य.**

म्हणजे, तूं राधे राधे असें पाहिजे तितकें म्हण, पण राधेय म्हणूं नको, तो **य** माझ्या कानाला दुःख देतो !

आणखी त्या राधेय शब्दाविषयीं तिनें म्हटलें आहे:—

**आर्यार्ध.**

**हे मात्र न ऐकवती सुखद मला मनुदुमिलित राधेय.**

म्हणजे **राधेय** हे वर्णमात्र माझ्यानें ऐकवत नाहींत. परंतु, हींच तीन अक्षरें क्रमानें **म नु दु** ह्या तीन अक्षरांच्या मागें जोडलीं म्हणजे जे शब्द होतात, ते मला प्रिय आहेत; म्हणजे **म**च्या मागें **रा** लावला कीं **राम** झाला, **नु**च्या मागें **धे** लाविला कीं **धेनु** झाला, आणि **दु**च्या मागें **य** लाविला कीं **यदु** झाला, हे तिन्ही पदार्थ म्हणजे राम, धेनु, आणि यदु हे मला प्रिय आहेत.

धृतराष्ट्राचें सांगणें पांडवांस होतें:—

**आर्या.**

**आत्यांत पुन्हा वि[1]ग्रह न प्रगटावा न पू[2]र्वे तापावे**
**कुल[3]जविरोधें संतत तापगुण मनीं अपूर्वता पावे.**

---

१. कलह. २ वाडवडील. ३ सोयरेधायरे.

ह्यांतल्या उत्तरार्धाचा अर्थ असा कीं, सोयऱ्याधायऱ्यांशीं विरोध केल्यानें मनुष्य अपूर्व तापगुण, ह्मणजे अपूर्व तो अर्थात् पश्चात् तापगुण, ह्मणजे पश्चात्ताप पावतो.

### आर्यार्ध.

प्रथमचि सुगल मथी त्या ज्याच्या नामांत **या** पुढें ये **तू**

ज्याच्या नांवांत **या**च्या पुढें **तू** येतो—म्हणजे **यातू** शब्द होतो. यातू=राक्षस.

### आर्यार्ध.

उत्पूर्व**सव** जगा दे ब्रह्मसुख म्हणुनि जया म्हणति कवि **क**

उत् हा उपसर्ग ज्याच्या पूर्वीं आहे असा **सव**—म्हणजे उत्सव—ब्रह्मसुख देतो, त्यालाच कवि **क** म्हणतात. क=आनंद—सुख.

### आर्यार्ध.

यन्नामीं आधीं **त्रि** प्रांतीं **टा** हा **ज**कार त्यांमध्यें.

म्हणजे **त्रिजटा.**

जेव्हां पांडव गंधमादन पर्वतावर गेले होते, तेव्हां धर्माचें अनुमत घेऊन भीमानें आपला पुत्र घटोत्कच यास बोलाविलें, त्याचें वर्णन पंतांनीं केलें आहेः—

### आर्या.

धर्मानुमतें स्मरतां ह्याया गुरुदास्यपुण्य जनकानें
ऐके घरीं घ टोत्कच नमनीं तो सत्यपुण्यजन कानें.

भीमानें **घटोत्कच** अशी हाक मारिली तेव्हां, घटोत्कचानें घ तेवढा घरीं ऐकिला, आणि **टोत्कच** हीं अक्षरें भीमाच्या पायांवर

मस्तक ठेवतांना ऐकिलीं, इतका तो त्वरित आला, हें तात्पर्यः— विजेपेक्षांही चपल नव्हे काय! दृष्टांत न देतां चपलता प्रगट करण्याचें चातुर्य मोरोपंतांचें आहे.

हीं जडपें आहेत. हीं प्रथम कळत नाहींत. कठिण वाटतात, आणि बरें वाटत नाहीं; पण तीं उलगडल्यावर जो आनंद होतो, तो अवर्णनीय आहे.

आमच्या ज्या संस्कृत ग्रंथांवरून मध्यमकालीन कवींनीं महाराष्ट्र ग्रंथ लिहिले आहेत, त्यांत मुख्य प्रकार दोन दिसतात, ह्मणजे कांहीं ग्रंथ अध्यात्मविषयक आहेत, ते थोडे आहेत. आणि कांहीं ऐतिहासिक आहेत, ते पुष्कळ आहेत. ह्यांपैकीं अध्यात्मिक ग्रंथांचें महाराष्ट्री करतांना त्यांस फार विस्तार करावा लागला आहे. त्याशिवाय, त्यांचें स्पष्टीकरण पुरेंच होईना. भगवद्गीता हिचे मूळ संस्कृत श्लोक ७०० आहेत. त्यांचाच अर्थ ती ज्ञानेश्वरी; तिच्या ओंव्या ९०३७ झाल्या आहेत. ह्याच्या उलट ऐतिहासिक ग्रंथांचे आहे. महाभारतांत शल्यपर्वाचे श्लोक मूळांत १६६७ आहेत. त्या सगळ्यांचें सार मोरोपंतांनीं मराठींत ३८२ आर्यांत गोंविलें आहे. मूळांतल्या २९ अध्यायांचे ह्यांनीं ४ अध्याय केले आहेत.

आमच्या ह्या कालच्या कवींनीं संस्कृतावरून ग्रंथ लिहितांना कोणता क्रम धरिला आहे, ह्याचें थोडेंसें विवेचन श्रीधरांनीं केलें आहे, तें असें:—

**ओंव्या.**

**भारत महा क्षीरसागर असंभाव्य भरला थोर**<br>
**तेथें ब्रह्मानंद श्रीधर तृषाक्रांत धांवला. १.**

त्यांतील अंजलीनें किंचित घेतलें तृषानिवारणार्थ
तैसा सारभाग यथार्थ भारतांत निवडिला. २.
पाल्हाळ बोलतां अपार ग्रंथ होईल जैसा समुद्र
बोलतां ध्वनित अणुमात्र कथा विचित्र दिसेना. ३.
संकोच पाल्हाळ टाकोनि समस्त मित रसाळ प्रगटला ग्रंथ
रचनासाहित्य पंढरीनाथ कर्ता येथें जाणिजे. ४.

अनुक्रमणिका सांप्रतकाळच्या ग्रंथांत आरंभीं दिलेली असते, तरी ती शेवटीं तयार करून छापलेली असते. परंतु, ह्या कालच्या ग्रंथांत शेवटींच देत असत, ती कांहीं वेगळ्या प्रकारें अध्यायवार देत असत, तिचा नमुना असाः—

ओव्या.

चौसष्ट अध्याय समस्त अवघा वर्णिला हा ग्रंथ
चौदा अध्यायपर्यंत आदिपर्व जाणिजे. १.
आठ अध्याय सभापर्व वनपर्व अध्याय नव
चार अध्याय अभिनव विराटपर्व जाणिजे. २.
उद्योगपर्व पांच अध्याय जाण भीष्मपर्व अध्याय तीन
तीन अध्यायचि द्रोणपर्व असे वर्णिलें. ३.
कर्णपर्व अध्याय तीन एक अध्याय शल्यपर्व पूर्ण.
गदापर्वही जाण एका अध्यायीं वर्णिलें. ४.
एक अध्याय सौप्तिक एकचि अध्याय ऐषिक
तैसेंच जाणावें विशोक एक अध्यायें वर्णिलें. ५.
एकच अध्यायीं स्त्रीपर्व दोन अध्याय शांतिपर्व अभिनव
साहा अध्याय अश्वमेध अपूर्व अति सुरस वर्णिला. ६.
शेवटीं आश्रमवासिक एकाच अध्यायीं वर्णिलें देख
एकूण चौसष्ट अध्याय अमोलिक आदिपर्वापासोनी. ७.

श्रीधर.

शिवाय, ह्या काळच्या काव्याचें दुसरें एक लक्षण असें आहे कीं, तीं काव्यें, परमेश्वरी स्फूर्तीनें, आपणांस लिहितां आलीं आहेत, आणि त्यानें आपल्या जिण्याचें सार्थक्य झालें आहे, असें कवींच्या मनांत भरलेलें असे. तें त्यांच्या लेखनांतून कधीं कधीं दृष्टीस पडतें.

### ओव्या.

ब्रह्मानंदा पंढरीनाथा पुढें बोलवीं भारतकथा.
आदिमध्यांत तत्वता तूंचि कर्ता असती पैं. १.
वाजविणार नाहीं बरवा तरी कसा वाजेल पांवा
रुक्मिणीजीवना करुणार्णवा श्रीधरवरदा सुखाब्धे. २.
पुढें कथा रसभरित सुधारसाहुनी गोड बहुत
श्रीधरमुखें पंढरीनाथ अति सुरस वदवील. ३.
बालकाचा धरोनि हात स्वयेंचि लिही जैसा पंडित
त्याचि परी श्रीरुक्मिणीकांत अर्थसहित सर्वकर्ता. ४.
ब्रह्मानंद पंढरीनाथ श्रीधरवरद अत्यद्भुत
तो जें जें कर्णीं सांगत तेंचि येथें लिहिलें असे. ५.

श्रीधर.

### अभंग.

बोलिलों जैसें बोलविलें देवें माझें तुम्हां ठावें जातिकुळ. १.
आपुलिया बळें नाहीं बोलवत सखा कृपावंत वाचा त्याची. २.
साळुंखी मंजुळ बोलतसे वाणी बोलविता धनी वेगळाची. ३.
काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें परि त्या विश्वंभरें बोलविलें. ४.

तुकाराम.

असो. अशा प्रकारें ज्यांचा सगळा विश्वास देवावर होता, आपण कांहींएक करीत नाहीं, देव सर्व कांहीं करितो, सर्व सत्ता त्याची

आहे, असें ज्यांस अंतःकरणापासून वाटत होतें, त्यांला आपल्या ग्रंथांतल्या व्यंगांविषयीं संकोच वाटूं नये, आणि त्यांच्या शब्दरचनेंत प्रसाद विपुल असावा, हें अगदीं साहाजिक आहे.

आणखी महाराष्ट्र वाङ्मयाचें स्वारस्य मनांत बरोबर उतरायास महाराष्ट्रधर्माची, आणि महाराष्ट्रांतल्या लोकांच्या व्यवहारांची व समजुतींची माहिती अवश्य पाहिजे आहे. ती सगळी कोठें एके जागीं सांपडावयाची नाहीं. तिचा थोडासा अंश ग्रंथांत दिलेला आहे, पण बहुतेक भाग लोकांच्या समजुतींत, व्यवहारांत आणि बोलण्यांतच आहे. तो परकीयांस केवळ सहवासानें मात्र संपादतां यावयाचा आहे. अठरा धान्यें, त्रिदोष, चौदा रत्नें, असें पुष्कळ बोलण्यांत येतें, पण तें तपशीलवार माहीत नसतें. त्याविषयीं कांहीं प्रथम सांगतों.

**अठरा पुराणें**:–ब्रह्म, पद्म, विष्णु, शिव, लिंग, गरुड, नारद, भागवत, अग्नि, स्कंद, भविष्य, ब्रह्मवैवर्त, मार्कंडेय, वामन, वराह, मत्स्य, कूर्म, ब्रह्मांड.

**अठरा धान्यें**:–गहूं, साळ, तूर, जव, जोंधळा, वाटाणा, लांक, चणा, जवस, मसूर, मूग, राळा, तीळ, हरीक, कुळीथ, सावा, उडीद, चवळी.

**अष्टाधिकार**:–जलाधिकार, स्थलाधिकार, ग्रामाधिकार, कुललेखन, ब्रह्मासन, दंडविधिनियोग, पौरोहित्य, ज्योतिषी.

**चौदा रत्नें**:–लक्ष्मी, कौस्तुभ, पारिजातक, सुरा, धन्वंतरी, चंद्र, कामधेनु, ऐरावत, अप्सरा, सप्तमुखी अश्व, विष, हरिधनु, शंख, अमृत.

**चौदा विद्याः**–ब्रह्मज्ञान, रसायण, स्वरधर, वेद, ज्योतिष, व्याकरण, धनुर्विद्या, जलतरण, न्याय, लोक, अश्वारोहण, नट, ऋषी, वैद्य.

**चौसष्टकळाः**–गीत, वाद्य, नृत्य, नाट्य, आलेख्य, विशेषकच्छेद्य, तंडुलकुसुमबलिप्रकार, पुष्पास्तरण, दशनवसनांगराग इत्यादि.

**त्रिदोषः**–कफ, वात, पित्त.

**त्रिलोकः**–स्वर्ग, मृत्यु, पाताल.

**त्रिविधः**–(पाप) कायिक, वाचिक, मानसिक.

**त्रिस्थलीयात्राः**–काशी, प्रयाग, गया.

**दशग्रंथः**–संहिता, ब्राह्मण, अरण, शिक्षा, कल्प, व्याकरण, निघंट, निरुक्त, छंद, ज्योतिष.

**नवखंडेंः**–(जंबुद्वीपाचीं) इलावृत्त, भद्राश्व, हरिवर्ष, किंपुरुष, केतुमाल, रम्यक, भरत, हिरण्यमय, उत्तरकुरू. २ भरत, वर्त, राम, द्रामाळा, केतुमाल, हिरे, विधिवस, महि, सुवर्ण.

**नवरत्नेंः**–हिरा, माणीक, मोतीं, गोमेद, इंद्रनील, पाच, प्रवाल, पुष्कराज, वैदूर्य अथवा तोर्मल्ली.

**नवरसः**–शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत, शांत.

**पंचमहापातकेंः**–ब्रह्महत्या, मद्यपान, चोरी, गुरुपत्नीगमन, व ह्या चोहोंचा संसर्ग, हें पांचवें.

**पंचगंगाः**–कृष्णा, वेणा, कोयना, गायत्री व सावित्री.

**पंचगव्यः**–गाईचें दूध, दहीं, तूप, मूत व शेण.

**पंचग्रंथः**–(यजुर्वेदाचे) संहिता, ब्राह्मण, अरण, पदें, क्रम.

**पंचांगः**–(पांच अंगें) तिथि, वार, योग, नक्षत्र, करण.

**षट्कर्मैः**–( ब्राह्मणांचीं ) अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान, प्रतिग्रह. २ जारण, मारण, उच्चाटण, मोहन, स्तंभन, विध्वंसन. ३ कणवृत्ति, प्रतिग्रह, याचना, कृषि, वाणिज्यवृत्ति, गोरक्ष. (म्हणजे, दाणे टिपणें, दान घेणें, भिक्षा मागणें, शेत करणें, व्यापार करणें, गाई राखणें, हीं कामें ब्राह्मणानें उपजीविकेकरितां करावीं.)

**षड्रसः**–गोड, आंबट, खारट, तिखट, तुरट, कडू.

**षड्रिपुः**–काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर.

**सप्तस्वरः**–सा, रि, ग, म, प, ध, नि. निशाध, ऋषभ, गांधार, षड्ज, मध्यम, धैवत, पंचम.

**साडेतीन पोशाखः**–पागोटें, शालजोडी किं० शेला, (पायजमा अ० झगा करायास) महामुदी, (अर्धा तुकडा किनखापाचा) पटका.

**साडेतीन मुहूर्तः**–दसरा, दिवाळीची प्रतिपदा, वर्षप्रतिपदा, नागपंचमी.

**साडेतीन शाहाणेः**–सखाराम बापू, विठ्ठल सुंदर, विठ्ठल देवजी, (अर्धा शहाणा) नाना फडनवीस.

धर्मव्यवहारांतल्या पुष्कळ गोष्टी सहज बोलण्यांत येतात. त्यांतल्या कांहीं सांगतोंः—

भीमानें म्हटलें आहेः—

**आर्या.**

**विष्णुपदीं पिंड तसा शत्रुशिरीं पाय देय जो डावा**
**तो म्यां दिला अधिक याहुनि जन्मुनि अर्थ काय जोडावा.**

**मोरोपंत.**

ह्या आर्येचें रहस्य कळण्यास विष्णुपदीं पिंड दिल्याचें पुण्य चांगलें ठाऊक पाहिजे.

### आर्यार्ध.

स्वर्गपरें पुत्राचा बांधावा काय पाळणा रानीं.

मोरोपंत.

पुत्राच्या हातून पिंड मिळणें हें स्वर्गप्राप्तीस अवश्य आहे, हें ज्ञात असल्यावांचून ह्याचा अर्थ बरोबर मनांत भरायाचा नाहीं.

### श्लोकार्ध.

दया प्रगट दाखवी कवण सांग त्या वारणीं<br>
सतीव्यसनवारणीं जयजयार्थ त्या वा रणीं.

मोरोपंत.

ह्या दोन ओळींचें मर्म बरोबर लक्षांत येण्यास गजेंद्रमोक्ष, द्रौपदीवस्त्रहरण, आणि भारती युद्ध ह्यांचा इतिहास चांगला अवगत असला पाहिजे.

### श्लोक.

हे वामनैकपद भूमि नसोनि जंघी<br>
एका दिसांत दिनराज नभास लंघी<br>
वारांशि वानरविलंघित होय तो कीं<br>
लोकीं नसे नलयशस्तुलना विलोकीं.

रघुनाथ पंडित.

हा श्लोक बरोबर समजण्यास वामनचरित्र, सेतुबंध, इत्यादि प्रकरणें चांगलीं अवगत पाहिजेत.

### अभंग.

भगवंतीं घडे जेणें अंतराय हो का बाप माय त्यजावी ते. १.
येर प्रिया पुत्रा असे कोण लेखा करिती ते दुःखा पात्र शत्रु. २.
प्रऱ्हादें जनक बिभीषणें बंधु तैशी मातानिंदु भरतें केली. ३.

तुकाराम.

ह्या अभंग बरोबर लक्षांत येण्यास प्रऱ्हादचरित्र, रावणाचा वृत्तांत, आणि भरतभाव, हीं काव्यें अवगत पाहिजेत.

### श्लोक.

घड्या हो वस्त्रांच्या रजकपरिमार्जीत जितुक्या
जलस्पर्शें होती वरिल घडिनें शुद्ध तितुक्या
अशासाठीं मध्यें भजन हरिचें ज्या घडिं घडे
तियेच्या संसर्गें इतर घडियांचा मळ झडे.

वामन.

ह्या श्लोकाचा अर्थ बरोबर लक्षांत येण्यास आणि घडी ह्या शब्दावरची कोटी समजण्यास ही जुनी रीति माहीत पाहिजे कीं, परटाकडून धुऊन आलेल्या कपड्यांच्या घड्यांच्या राशींतल्या वरच्या घडीवर शंखोदकाचें सिंचन केलें म्हणजे, तिच्या संसर्गानें तिच्या खालच्या सगळ्या घड्या शुद्ध होतात, अशी पूर्वींची समजूत आहे

## २. गद्यकाल.

आह्मीं ह्या पूर्वींच्या काळास पद्यकाल ह्मटलें आहे, ह्याचा अर्थ असा घ्यावयाचा कीं, त्या काळांत गद्यापेक्षां पद्य पुष्कळ उत्पन्न झालें. त्याप्रमाणेंच, ह्या दुसऱ्या भागास गद्यकाल म्हणण्याचा हेतु एवढाच आहे कीं, ह्यांत पद्यापेक्षां गद्य फार उत्पन्न होत आहे. ह्या कालाचा आरंभ इंग्रजी राज्याच्या स्थापनेबरोबर झाला. इंग्रजी राज्याबरोबर नेहमीं भौतिक सुखाचीं जीं अग्रगण्य म्हणून साधनें असतात, त्यांत छापण्याची कला ही प्रमुख असते. ती इकडे आल्यावर दहा वर्षांनीं इ० स० १८२६ त मुंबईत एक मराठी पुस्तक छापून प्रसिद्ध झालें. तेव्हांपासून, इ० स० १८५७ पर्यंत बत्तीस वर्षांत, ७५ मराठी लहानमोठीं पुस्तकें छापलीं. त्यांत केवळ शालोपयोगी २५ होतीं. ही यादी **रावसाहेब गणेश जनार्दन आगाशे** ह्यांनीं इ० स० १८९८ च्या जुलै महिन्याच्या विविधज्ञानविस्तारांत दिली आहे. तींत **कृष्णशास्त्री चिपळूणकर**कृत **अर्थशास्त्र** आणि **कृष्णशास्त्री राजवाडे**कृत **अलंकारविवेक** हीं पुस्तकें प्रमुखत्वेंकरून सांगितलीं आहेत. तीं एवढ्याचकरितां कीं, त्या वेळापासून महाराष्ट्र वाङ्मयामध्यें ज्ञानाचा जो ओघ वाहूं लागला आहे, त्यास मुख्य प्रवाह इंग्रजी भाषा आणि संस्कृत भाषा हे आहेत, हें दर्शवायाचें होतें. हे प्रवाह दिवसानुदिवस मोठे होत जाऊन स० १८२६ पासून १८६४ पर्यंत, ३८ वर्षांत, मराठींत ६६१ पुस्तकें छापलीं. पुढें इ० स० १८७६ पासून १९०० पर्यंत, २५ वर्षांत, पुनरावृत्ति नव्हत अशीं नवीं ३३७६ छापलीं.

हा जो ग्रंथसंग्रह वृद्धि पावत आहे, त्यांत वेगळ्या वेगळ्या विषयांचें मान कसें काय आहे, हें दाखविण्याकरितां **रावसाहेब**

**गणेश जनार्दन आगाशे** ह्यांनीं इ० स० १८८३ पासून १८९९ पर्यंत प्रथमावृत्तीचीं जीं एकंदर २४६९ पुस्तकें प्रसिद्ध झालीं, त्यांची विल्हेवारी दिली आहे, ती येणेंप्रमाणें:—

| | |
|---|---|
| किरकोळ | ८२२ |
| कविता | ३५६ |
| नाटकें | ३०६ |
| कादंबऱ्या | २०४ |
| भाषाज्ञान | १४३ |
| चरित्रें | १०७ |
| सृष्टपदार्थज्ञान | १०३ |
| हुन्नर | ९९ |
| इतिहास | ७४ |
| वैद्यक | ६५ |
| गणित, यंत्रशास्त्र | ५९ |
| धर्म | ४० |
| तत्वज्ञान | ४० |
| कायदा | २० |
| राजनीति | १९ |
| प्रवासवर्णन | १२ |
| | २४६९ |

ह्या नवीन ग्रंथसंपत्तीविषयीं आमचे शोधक आणि विद्वान् मित्र रावसाहेब गणेश जनार्दन आगाशे ह्यांनीं, स्थूळ मानाचा आढावा आपल्या व्याख्यानांत असा सांगितला आहे कीं, "इंग्रजी अंमल सुरू झाल्यापासून मोजदाद केली असतां, एकंदर नवीन प्रथमावृत्तीचा आंकडा ४९१३ येतो, अथवा स्थूळ मानानें, इ० स० १८२६ पासून

१९०० अखेर ७५ वर्षांत ५००० नवीन पुस्तकें झालीं, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं." आपल्या राष्ट्राच्या स्थितीच्या मानानें हें कांहीं अगदीं थोडें नाहीं.

ह्या ग्रंथांचें अवलोकन केलें तर असें दिसून येईल कीं आमच्यांतल्या ज्या चांगल्या माणसांस स्वदेशस्थिति चांगली कळली आहे, आणि ज्ञान हा एवढाच काय तो उद्धारमार्ग आपल्या देशास राहिला आहे, असें वाटत आहे, ते त्या कार्यास साह्यभूत असें जें ज्ञान, तें जेथें आढळेल तेथून काढून मराठींत आणून टाकण्याच्या उद्योगास लागले आहेत. त्यांत संस्कृतांतल्यापेक्षां इंग्रजींतला प्रवाह फार मोठा आहे. संस्कृताचें मराठी करतात, तीं बहुतेक नाटकें अथवा काव्यें असतात, आणि क्वचित् इंग्रजीच्या आधारानेंही कांहीं पद्यें लिहितात. अशा प्रकारच्या पद्यग्रंथकर्त्यांत अग्रगण्य भास्कर दामोदर पाळंदे, कृष्णशास्त्री राजवाडे, परशुरामपंत तात्या गोडबोले, गणेशशास्त्री लेले, गणेश जनार्दन आगाशे, इत्यादि मंडळी नामांकित आहे. त्यांच्या काव्यांतले थोडेसे उतारे येथें केवळ मासल्याकरितां देतों:—

गृहिणीचे अलंकार:—

### आर्या.

सद्वर्तन पतिनिष्ठा सस्मित वदन स्वकांतहितमनन<br>
नियमितधनसंतुष्टा सलीलवाणी सदैव शांतमन. १.

कोमलता भूतदया आदर लज्जा सुगंध सत्कार<br>
वाचन गायन कांहीं निर्धन बंधूजनांस उपकार. २.

बालकलालनपालन निर्मलता जागरूक गृह भरणें<br>
ज्ञानी सारे म्हणती समजा कीं हींच अंगनाभरणें. ३.

सर टी. माधवराव.

परमेश्वरप्रार्थनाः—

श्लोक.

जगत्पाळ चित्तांत माझ्या वसावा
दया लोभ त्याचा सदाही असावा
न तत्सेवनीं जीव माझा चुकावा
कधींही न तो नित्य सौख्या मुकावा. १.
दयासिंधु मीं नित्य तूतें स्मरावें
तुझ्या पादपद्मास चित्तीं धरावें
पुढें वासनाभृंग तेथें जमावे
कधींही न अन्य स्थळीं ते रमावे. २.

भास्कर दामोदर पाळंदे.

साध्वीनदीः—

श्लोक.

साध्वी निर्झरिणी बघोनि नयनीं धालों मुदें मी किती
शांतांतःकरणा पवित्रचरणा मंदा असे तद्गती
स्वानंदांत निमग्न मूढजनसंसर्गा त्यजूनी दुरी
लक्षी मार्ग बरा सदा निजबळें विघ्नां समस्तां हरी. १.
जे जे ते करिते परोपकृति ते सौंदर्य ते पावते
जाते जेथ तिथें मदा वितरिते आशीर्वचा लाभते
कैशीं निर्मलहृज्जलीं विकसलीं प्रेमांबुजें साजिरीं.
स्वर्गीचें प्रतिबिंब त्यांत पडलें सत्वप्रिया गोजिरी. २.

विष्णु मोरेश्वर महाजनी.

माधवीचें पुष्पः—

दिंड्या.

माधवीचें हें पुष्प डुले वातें
एकटें या वल्लीस शोभवीतें
इतर पुष्पें केव्हांच गळुन गेलीं
अहा गंधाची माधुरी निमाली. १.
नसे येथें एकही बंधु याला
नसे कलिकाही दुजी या लतेला
एकमेकांचा सुखस्पर्श होतां
हंसति सुमनें तो काल कुठें आतां. २.
रम्य सुमना! ही दशा दीनवाणी
पाहुनीयां लोचनीं येइ पाणी
लतेपासुनि मी तुला खुडुनि टाकीं
नको होऊं तूं मग्न असें शोकीं. ३.
जेथ गेले त्वद्बंधु तेथ जाईं
सवें त्यांच्या तूं गाढ झोंप घेईं
जेथ लोपे तन्मूर्ति सुवासाची
तेथ विखुरीं पांकळ्यां तुझ्या साची. ४.
खऱ्या प्रेमाचें स्थान सखे जातां
पिता भ्राता सुत दार तशी माता
रहायाला इच्छील कोण मागें
शून्य ऐशा या जगीं मला सांगें. ५.

विष्णु मोरेश्वर महाजनी.

प्रभात आणि प्रमदाः—

श्लोक.

सकाळीं कारंजीं उडत असतां शीतळ हवा
तशीं पुष्पें होती विकसित सुगंधें डुलति वा
तयांचीं ज्या काळीं विलसति पहा हास्यवदनें
जनांच्या चित्ताला रमविति अनेकाख्य सुमनें. १.
फुलें वेंचायाला जमति मिळुनी कांहिं अबला
तयांचीं वारा तो उडवि लुगडीं दावुनि कला
जणों झोंबे अंगा तरिहि न निवारी जन तया
झटे कीं देखाया अवयवच ते सोडुनि भया. २.

गोविंद वासुदेव कानिटकर.

विरहविलापः—

श्लोक.

स्वरूपें काव्याच्या अजवरि सखे जे प्रकटले
विलास प्रीतीचे सरस अमृतातुल्य घडले
तयांचा दुर्दैवें अवचित असा नाश घडतां
पुढें आतां कैशी मधुर मम होईल कविता. १.
तीं भाषणें मधुर जीं अमृतासमान
लावण्य तें रतिहि देत जयास मान
तें शील ज्यास तुलना न मिळेचि कोठें
कोणास हर्ष गुण हे स्तवितां न वाटे. २.

कृष्णशास्त्री चिपळूणकर.

राजेलोकांस दोन हिताचे शब्दः—

श्लोक.

राजे हो अजि हस्त जोडुनि तुम्हां विज्ञापितों गौरवें

द्वेषें हानि घडे कुबुद्धि उगवे वैषम्य वाढे जवें
ऐश्वर्या क्षय ये सुभाग्य पळ घे पुण्यास ये ऱ्हस्वता
माझें ऐकुनि अल्प भाषित अहो स्वद्वेष टाका अतां. १.
टाका तो मतभेद बांधव अहो मित्रत्व तो नाशितो
स्वीकारा सखिभाव अंतरिं बरा थोरांस तो शोभतो
तेणें लाभ तुम्हांस एक दिवशीं होतील मोठे किती
सांगाया न शकें असेंच समजा त्यांतें नसे कीं मिती. २.

परस्परां भेटुनि मित्र व्हावें
वैषम्य सारें विसरोनि जावें
संरक्तता ही शुभ चिन्ह आहे
स्वदेशभक्तांस न विघ्न साहे. ३.

**वामन दाजी ओक.**

संभाजीची बाळक्रीडाः—

**श्लोक.**

चिमुकली पगडी झळके शिरीं
चिमुकली तरवार धरी करीं
चिमुकला चढती वर चोळणा
चिमकुला सरदार निघे रणा. १.
छबुकडा चिमणा करितो गुण
चिमुकलें धरिलें मग रंगण
दुडदुडां पळतां पळतां पडे
गडबडे रडतां मुख बापुडें. २.
शिवाजीसही फार संतोष झाला
उठे बाळ घेऊं स्वता तो निघाला
धरी त्यास हातांत घेऊनि झेली
महा रम्य खेळे महा मात झाली. ३.

**महादेव मोरेश्वर कुंटे.**

वासंतवनश्रीः—

श्लोक.

वसंत ऋतु पातला तंव सुगंधशाली फुलें
अलीं बहुत साजिरीं म्हणुनि तैं तरू शोभले
वनीं प्रथम कोकिला करिति मुग्धनारीपरी
मनोज्ञमितभाषणा सुखवि जें जनां अंतरीं. १.

बागांतल्या सुंदर वेलि देख
त्या नर्तकी भासति तैं सुरेख
आले तयां पल्लव जे नवीन
तें पाणियुग्म स्फुट होय जाण. २.
वातें हले जैं सुकुमार पाला
तो पाणिचा भाव गमे मनाला
शिरीं तयांच्या अलिवृंद गाती
त्या रूपकीं ह्या गमतात गीती. ३.

गणेशशास्त्री लेले.

मुलीस सासरीं जातांना आईचा बोधः—

श्लोक.

सर्वां आधीं उठावें स्मरण धरुनियां मागुती त्वां निजावें
वस्त्रां पात्रां जपावें कधिं नच पुसल्यावीण बाहेर जावें
कामीं काजीं श्रमावें अळस करुनियां त्वां न कोठें गमावें
सद्ग्रंथानें रमावें शयनिं पहुडतां श्रीहरीतें नमावें. १.

सकाळीं मुली काढुनी केरवारे
गृहा सारवोनी करीं स्वच्छ सारें
फुलें स्वस्तिकें रांगुळीचीं लिहावीं
अशीं कीं जनें कौतुकें तीं पहावीं. २.

निगा चांगली राख वृंदावनाची
जया पाहतां तृप्ति व्हावी मनाची
फुटोनी तरू येत जेव्हां बहार
फुलें वेंचुनी गुंफ तूं लांब हार. ३.
वेणी बरी घालुनियां सकाळीं
अत्यादरें कुंकुम लाव भाळीं
मोठें नसावें टिकली नसावी
लोकांमधें सज्जनता दिसावी. ४.

शांती सोडुं नको कधीं रुसुं नको स्वच्छंद वागूं नको
लज्जा सोडुं नको उगी बसुं नको कोणास मागूं नको
रागें बोलुं नको अढी धरुं नको चोरूनि खाऊं नको
कोठें जाउं नको परस्थ पुरुषा पाहूनि हांसूं नको. ५.

कृष्णाजी नारायण आठल्ये.

रूढिमाहात्म्य—

श्लोक.

अये रूढे वर्णूं अतुल महिमा मी तव किती
न शास्त्राची सुद्धां तुजपुढति गे चालत गती
तुझे झाले पाहीं जन सकळही दास जगतीं
नमस्तुभ्यं रूढे खचित अससी तूं बलवती. १.
त्वदाज्ञेनें लोकीं जन विफल वित्तव्यय करी
त्वदाज्ञेनें भोगी अमित विपदा कष्टहि वरी
त्वदाज्ञा भंगाया नच विबुधही लोक धजती
नमस्तुभ्यं रूढे खचित अससी तूं बलवती. २.
कसें वस्त्रा ल्यावें कच शिरिं असावे किति कसे
टिळा कैसा जोडा कवण कुडत्याला किति कसे

कसें पागोटें तें वद्दु जबर सत्ता तव किती
नमस्तुभ्यं रूढे खचित अससी तूं बलवती. ३.
खऱ्या कर्मा फांटा कधिंहि नच तोटा अविहितीं
भिकाऱ्याला सोंटा परि विनय मोठा धनयुतीं
द्विजा पैसा खोटा गणपतिस रोंठा वितरिती
नमस्तुभ्यं रूढे खचित असती तूं बलवती. ४.
अलंकारासाठीं युवति पतिला व्यर्थ छळिती
ऋणें सौख्या चोरांकरविं कधिं जीवा हरपती
अपत्यें जीं प्राणाहुनि अधिक त्यांनाहि मुकती
नमस्तुभ्यं रूढे खचित असती तूं बलवती. ५.
मनःपावित्र्याची च्युति नच घडावी ह्मणवुनी
असे स्पर्शास्पर्शादिक नियम केला ऋषिजनीं
मनीं पापा ध्याती परि जन विटाळास जपती
नमस्तुभ्यं रूढे खचित असती तूं बलवती. ६.
द्विजांचें तें वेदाध्ययन तप सर्वस्व सुटलें
क्षमेचें सत्याचें किमपि धृतिचें नांव नुरलें
सदाचारा ऐशा त्यजुनि वितथाचार वरिती
नमस्तुभ्यं रूढे खचित असती तूं बलवती. ७.
जळीं वस्त्रीं देहीं शुचि अशुचि आचार उरला
विटाळाचा चित्तीं नुमज नुसता शब्द उरला
अशा मिथ्याचारीं द्विज रमति हे तो तव कृती
नमस्तुभ्यं रूढे खचित असती तूं बलवती. ८.

गणेश जनार्दन आगाशे.

दारिद्र्यप्रभावः—

श्लोक.

जेव्हांहि भाग्यक्षय दुर्दशा नरा
येते अशी काळकृता सुदुर्धरा

घेतात मित्रेंहि अमित्रता तदा
कंटाळती लोकहि रक्त जे सदा. १.

वेगातें करितो तुरंग गमनीं चालावयाला अती
त्याचीं तीं परि पावलें नचि तशीं शक्तिक्षयें चालती
तैशा पूरुषचित्तवृत्ति चपला चोहोंकडे धांवती
खिन्ना होउनि त्या पुनः परतुनी चित्ताप्रती पावती. २.

**परशुरामपंत तात्या.**

महाराष्ट्रीयांस मराठी भाषेविषयीं प्रार्थना:—

**आर्या.**

ज्यांच्या पराक्रमांचीं आनंदें गातसां तुम्ही गाणीं
त्या शूर पूर्वजांची तुमच्याही चालली लया वाणी. १.
त्याचें तुमचेंहि तुम्हां राखायाचें असेल नांव तरी
द्या हात हीस द्या हो पुण्याचें श्रेय घ्यावया पदरीं. २.
कोणी साह्य करो वा न करो कर्तव्य होय जें कर्म
केलेंच पाहिजे तें श्रेयस्कर हाच आपणां धर्म. ३.
क्षयरोग मुक्त अंतीं तुमची होवोनि देशभाषा ही
तुमच्या भव्य यशानें भरोनि टाकील हो दिशा दाही. ४.
दुर्दैवानें तुमचे यत्न जरी हे न शेवटा गेले
झालें स्वधर्मरक्षण समजा मोठेंच कार्य हें केलें. ५.
दोन्हीकडोनि अंतीं लाभाची जोड आपणां आहे
यास्तव तरी करा हो इतका हा कार्यभाग उत्साहें. ६.

**गंगाधर रामचंद्र मोगरे.**

असे जितके उतारे घ्यावे तितके थोडेच वाटतात. परंतु, स्थल-संकोचास्तव हें आटपलें पाहिजे. ह्या अलीकडच्या कवितांत भाषेची सरणी बहुतेक मागच्याच कवींची उचललेली आहे. पण क्वचित् कोठें

विचारपद्धति कांहींशी अपूर्व वाटते. ह्यास कारणें दोन आहेत. एक पाश्चात्य वाङ्मयाचा परिचय, आणि दुसरें स्थित्यंतर. ह्यांचीं स्थलें, थोड्या विचारानें, सहज तुमच्या लक्षांत येण्यासारखीं आहेत. आणखी दुसरें तुमच्या लक्षांत येईल कीं, पूर्वीं सांगितलेले कवि आणि हे कवि ह्यांच्यामध्यें जो एक मोठा भेद आहे, तो हा कीं, ते कवि परमार्थाला विशेष वाहलेले होते, आणि ह्या आलीकडच्या कवींचा ओढा मुख्यत्वें मनोरंजन, नीतिबोध आणि भाषागौरव ह्यांजकडे आहे.

आणखी आलीकडच्या ज्ञात्यांचें मत असें आहे कीं, कोणत्याही देशांत सुधारणा जसजशी वाढत जाते, तसतशी लोकांतली कविताशक्ति कमीकमी होत जाते. ह्याचा प्रत्यय इतर राष्ट्रांप्रमाणें ह्या राष्ट्रांतही स्पष्ट अनुभवास येत आहे. मुकुंदराज, ज्ञानदेवांच्या वेळेपासून आजपर्यंत झालेल्या काव्यांचें अवलोकन सूक्ष्म दृष्टीनें केलें म्हणजे हें सहज लक्षांत येतें. ज्याला प्रसाद ह्मणतात, ज्याला मनोवेधकता ह्मणतात, तो गुण कवितेमध्यें, सुधारणेच्या प्रवृद्धीच्या प्रमाणानें कमी कमी होत गेला आहे. परंतु, असें कां व्हावें, हें अद्याप कोणास सांगतां येत नाहीं.

ह्या गद्यकालाचे आणखी दोन भाग कल्पावे. १८२६ पासून १८७३ पर्यंत एक, आणि १८७३ पासून आजपर्यंत दुसरा. ह्यांतल्या पहिल्या भागांतले गद्यग्रंथ इंग्रजीचीं केवळ भाषांतरें किंवा रूपांतरें आहेत. त्यांच्या कर्त्यांत बाळशास्त्री जांभेकर, हरिकेशवजी, सदाशिव काशिनाथ छत्रे, दादोबा पांडुरंग, गोविंद नारायण माडगांवकर, महादेवशास्त्री कोलटकर, इत्यादि विद्वान् गृहस्थ प्रमुख होते. आणि दुसऱ्या भागांतल्या ग्रंथकारांत विष्णु परशुराम रानडे, विष्णु मोरेश्वर भिडे, गोपाळराव हरि देशमुख, कृष्णशास्त्री चिपळूणकर,

विष्णुशास्त्री चिपळूणकर, गोपाळराव आगरकर, इत्यादि पुरुषांचीं नांवें प्रसिद्ध आहेत. ह्या दोन प्रकारच्या लेखकांच्या लेखांत एक मोठें अंतर दिसतें. तें हें कीं, पहिल्या भागांतल्यांचे ग्रंथ म्हटले म्हणजे तर्जुमे आहेत, किंवा रूपांतरें आहेत. ह्याच्या पलीकडे त्यांत ग्रंथकारांचें स्वतःचें असें कांहीं सांपडावयाचें नाहीं. आणि जर सांपडलेंच, तर इंग्रजींतल्या विचारांच्या पुष्टीकरणाचें सांपडायाचें, त्याहून वेगळें किंवा त्याच्या उलट एक अक्षरही सांपडावयाचें नाहीं. ह्याचा दोष त्या ग्रंथकारांकडे नाहीं. कां कीं, तेव्हां अगदीं नवी इंग्रजी होती. पाश्चात्य ज्ञानाचा प्रसार मुळींच झाला नव्हता. इंग्रजांनीं आपणांस जिंकिलें आहे, त्या पक्षीं त्यांचें सगळेंच आपल्यापेक्षां चांगलें आहे, असें सर्व लोकांस वाटत होतें. त्यांनीं आमच्या लोकांची नसती निंदा केली, तरी तीही खरी वाटत असे. पुण्यासारख्या ब्राह्मणराजधानीस ब्राह्मण प्रभु नकोसा होऊन इंग्रज प्रभु आवडला, एवढीच गोष्ट जरी पाहिली, तरी, अवल इंग्रजींतल्या आमच्यांतल्या विद्वानांच्या मनाचा ओघ असा वाहवा, ह्याचें कांहीं आश्चर्य वाटत नाहीं. साखर दृष्टीस पडल्यावर गूळ कमी वाटावा; गुळाच्या ऐवजीं मध खायास मिळाल्यावर मध अधिक आवडावा; ह्यांत कांहीं विशेष नाहीं. तेंच धोरण त्या काळच्या मराठी ग्रंथांच्या वृत्तींत स्पष्ट दिसतें आहे. आणखी तेव्हांच्या आमच्यांतल्या विद्वानांस असें वाटत असे कीं, इंग्रजींत जें कांहीं आहे, तें सर्व कांहीं मराठींत आणून टाकिलें, म्हणजे इंग्रजींतल्या ज्ञानभांडारानें जसे इंग्लिश लोक श्रेष्ठता पावले आहेत, तसे त्या ज्ञानाच्या योगानें महाराष्ट्रांतले लोकही कालेंकरून त्यांच्या इतके श्रेष्ठ होतील. जें पौष्टिक एकाला चांगलें मानवलेलें दिसत आहे, तें दुसऱ्यासही तसें मानवावें, असें मनांत येणें साहा-

जिक आहे. ज्या नावेनें इंग्लिश लोक तरले आहेत, तिनें आम्हीं कां न तरावें? अशा विचारांनीं आमच्या मंडळीचीं मनें भरलीं असल्या कारणानें, कांहीं चांगलेंसें इंग्रजींत सांपडलें कीं तें मराठींत आणून टाकायाचा प्रयत्न ती करीत असे. आणि इंग्लिश भाषाही तेव्हां नवी दृष्टि प्राप्त झाल्याच्या योगानें, आमच्यांतल्या सगळ्या गोष्टींचें आणि व्यवहारांचें निरीक्षण इंग्लिश दृष्टीनें होई, तें अर्थात् परकें आणि वाईट होई, ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. तेव्हांच्या वर्तमानपत्रांतले मुख्य लिहिणारे म्हणजे रावबहादुर विष्णु परशुराम रानडे, रावबहादुर विष्णु मोरेश्वर भिडे, रावबहादुर गोपाळराव हरि देशमुख इत्यादि गृहस्थ होते. ह्यांपैकीं देशमुख हे "**लोकहितवादी**" ह्या नांवानें फार प्रसिद्ध असत. आणि सार्वजनिक विषयांवर ह्यांनीं जितकें लिहिलें आहे, तितकें दुसरें कोणीं लिहिलें नाहीं. त्यांचे पुष्कळ लेख एकत्र करून छापले आहेत. त्यांचे मोठमोठे चार पांच ग्रंथ झाले आहेत. ते छापल्यास आज पन्नास पंचावन वर्षें झालीं आहेत. त्यांचें धोरण आणि सध्याच्या लेखकांचें धोरण ह्यांच्यामध्यें जमीनअस्मानांचें अंतर दिसतें. पूर्वींचीं पुस्तकें विद्यार्थ्यांकरितां योजिलेलीं होतीं. शाळांतले अभ्यास, धर्मनीति, व्यवहारनीति इत्यादि विषयांच्या गोष्टी त्यांत सांगितलेल्या आहेत. आणि त्यांत स्वराष्ट्राच्या संबंधानें जें काय लिहिलें आहे, तें अगदीं साधें आणि सौम्य आहे. तीं बहुतेक इंग्रजीचीं भाषांतरें आहेत. परंतु, त्यानंतर पाश्चात्य ज्ञानाचा प्रसार होऊन, आपल्या देशाची खरी स्थिति आमच्या मंडळीस अधिकाधिक कळूं लागली, आमचें राष्ट्र इतर राष्ट्रांपेक्षां कोणकोणत्या विषयांत मागें पडलें आहे, आणि तें कां पडलें आहे, हें समजूं लागलें आहे, आणि तें मागें पडाऱ्यास कारणें काय काय झालीं आहेत, हें हळू हळू लक्षांत येऊं लागलें,

त्याप्रमाणें त्या धोरणाचीं पुस्तकें होण्यास आरंभ झाला. आणि तो प्रवाह आतां चांगला वाढीस लागला आहे, हें फार इष्ट झालें आहे.

ह्या आमच्या नवीन प्रकारच्या मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्धीमध्यें एक चमत्कार असा दिसून येतो कीं, पाश्चात्य विचारज्योति आमच्या ग्रंथकारांस जितकी जितकी जवळ जवळ होऊं लागली आहे, तितकें तितकें त्यांस आत्मस्वरूप अधिकाअधिक स्पष्ट दिसूं लागलें आहे. आणि, त्या मानानें त्यांच्या लेखांत सद्विचारांचें, स्वकर्तव्याचें आणि निस्पृहतेचें प्राबल्य आणि विशदत्व वाढत चाललें आहे. ह्मणजे, आपलें स्वरूप आपणांस दिसण्यास, आपल्या स्वतःच्या हातांतल्या दिव्यापेक्षां दुसऱ्याच्या हातांतला दिवा अधिक उपयोगीं पडत असतो, तसें कांहीं हें झालें आहे. आह्मी पाश्चात्यांच्या दृष्टीनें स्वनिरीक्षण करूं लागलों तसतसें आह्मांस आत्मज्ञान अधिकाधिक होऊं लागलें आहे, आणि स्वहितकर्तृत्वाची आमची शक्ति बळावत चालली आहे. ह्या म्हणण्याचा अर्थ स्पष्ट कळण्याकरितां उदाहरणार्थ आम्ही असें म्हणतों कीं, गोपाळराव हरि देशमुख हे पाश्चात्य ज्ञान-दीपज्योतीपासून बरेच दूर होते, विष्णुशास्त्री चिपळूणकर त्यांच्या-पेक्षां पुष्कळ जवळ गेले होते, आणि गोपाळराव आगरकर त्यांच्या-हीपेक्षां अधिक सन्निध गेले होते. म्हणजे, गोपाळराव हरि देशमु-खांच्या लेखांचा काल सुमारें इ०स० १८४८ पासून इ०स० १८७० पर्यंतचा २२ वर्षांचा होता. विष्णुशास्त्री ह्यांच्या लेखांचा काल इ०स० १८७४ पासून १८८० पर्यंतचा सहा वर्षांचा होता. आणि गोपाळ-राव आगरकरांच्या लेखांचा काल इ० स० १८८८ पासून १८९५ पर्यंतचा सात आठ वर्षांचा होता. तेव्हां त्यांच्या ह्या अधिकाधिक

सान्निध्याच्या मानानें त्यांच्या लेखांत कसा कसा अधिकाधिक जीव येत गेला आहे—आत्मज्ञान कसें प्रगट झालें आहे—आत्महिताची कळकळ कशी बाहेर पडली आहे—आणि पाश्चात्य विद्येच्या अधिकाधिक संस्काराच्या योगानें आमच्या सध्याच्या पिढीचीं मनें पाश्चात्यांच्या विचारांच्या वळणास कशीं लागलीं आहेत, हें स्पष्ट कळण्यासारखें आहे. म्हणून ह्या तिघां नामांकित ग्रंथकारांचे थोडथोडे लेख, येथें तुम्हांस सादर करितों. त्यांवरून तुम्हींच काय तें अनुमान करावें. तर मग आतां प्रथम गोपाळराव हरि देशमुखांचे लेख पहा.

ह्यांनीं लोकस्थितीविषयीं आणि लोकांच्या अज्ञानाविषयीं त्यांस लक्षून शंभर पत्रें लिहिलीं आहेत. त्यांत कोठें कोठें अगदीं ग्राम्य, अत्यंत अश्लील, फार रानवळ, आणि "हितवादी" म्हणविणाराच्या सभ्यतेस न शोभण्यासारखें आलेलें आहे. तरी, तें कळकळीचें, आस्थेचें आणि कदाचित् लेखनव्यवसायाच्या अनभ्यासाचें फल आहे. म्हणून त्याविषयीं कृपादृष्टि केली पाहिजे. ह्या संबंधानें त्यांनींच शेवटच्या पत्रांत म्हटलें आहेः—

"आज दोन वर्षें मीं लोकांस त्यांची स्थितिरीति कशी आहे ती अगदीं भीड न धरितां उघड करून सुचविली. त्यांत एकादें अक्षर अधिक उणें शुद्ध अशुद्ध कोणास वाटलें तर त्यांनीं क्षमा करावी...लोकहितवादीनें कोणाची मजुरी पतकरिली नाहीं. कशाची अपेक्षा, आशा किंवा इच्छा धरली नाहीं. कोणाच्या सांगण्यावरून व शिकविण्यावरून कृत्रिम वर्णन केलें नाहीं. लाभावर किंवा द्रव्यावर नजर देऊन कीर्ति व्हावी ह्या हेतूनें लिहिलें नाहीं. इतके श्रम जे केले, ते फक्त लोकांस त्यांची वास्तविक स्थिति कशी आहे ती कळावी, त्यांनीं सुधारावें, त्यांस इहलोकीं सुखवृद्धि व्हावी, परलोकींचें साधन घडावें, व आपले बहुत काळापासून दृढ ग्रह झाले आहेत, त्यांपैकीं कांहीं अविचारानें व कांहीं मूर्खपणानें जडलेले आहेत, ते कमी व्हावे, किंवा नाहींसे व्हावे, इत-

ऱ्याच हेतूनें मीं यथामतीनें व इच्छेनें वेतनावांचून श्रम केले आहेत. व जितकें लिहिलें आहे तें अक्षरशः खरें खरें निवडून विचार करून काळजीनें लिहिलें आहे. हें सर्व लोकांस कळत आहे. यास्तव या ग्रंथावर लोकहितवादी आपली सत्ता ठेवीत नाहीं...माझें मागणें सर्व लोकांस आहे कीं, मीं जें लिहिलें आहे, त्याचा विचार करून पहा. तुमच्या चांगल्यावांचून त्या लिहिण्याचा हेतु नाहीं."

अगदीं खरें आहे. ह्यांचे लेख जे कोणी मनापासून वाचतील, त्यांस ह्यांचें म्हणणें शब्दशः खरें वाटल्यावांचून राहाणार नाहीं. आतां पुढें त्यांच्या लेखांतले कांहीं उतारे द्यावयाचे आहेत. ते सलग नाहींत. तुटक तुटक आहेत. मागच्याचा संबंध पुढच्याशीं नाहीं, असे आहेत. तरी, त्या सर्वांमध्यें, स्वजनहित साधण्याच्या इच्छेची ज्योति, कमजास्त प्रमाणानें अगदीं स्पष्ट आहे. तीच मुख्यत्वें प्रदर्शित करावयाची आहे. आणखी, ह्यांच्या पुढच्या चिपळूणकरांच्या आणि आगरकरांच्या लेखांच्या उताऱ्यांत हाच हेतु आहे. ह्या सगळ्यांच्या संबंधानें एक मोठी गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी अशी आहे कीं, देशमुख ह्यांस विश्वविद्यालयाचा संस्कार झालेला नव्हता, आणि चिपळूणकर व आगरकर ह्यांस तो चांगला झालेला होता. त्याच्या योगानें देशमुखांच्या लेखांत भाषेचा ओबडधोबडपणा, आणि स्वस्थितीच्या सूक्ष्म निरीक्षणाची आणि अभिमानाची वाण ही पदोपदीं दिसत असून, चिपळूणकर आणि आगरकर ह्या दोघांची भाषा, त्यांची विचारव्याप्ति, त्यांचें विवेकस्वातंत्र्य, त्यांची निस्पृहता, आणि विशेषेंकरून त्यांचे कोटिक्रम, हीं विशेष विशद असून पुष्कळ अंशीं पाश्चिमात्यांच्यांशीं मिळतात, कितीएक स्थलीं तर प्रत्यक्ष पाश्चात्यांचीं दिसतात, आणि अत्यंत ग्राह्य वाटतात. हेंच पाश्चात्य ज्ञानाचें अत्युत्तम फल आम्ही समजतों. असो. आतां प्रथमतः **लोकहितवादी** ह्यांच्या लेखांतले उतारे देतोंः—

१. "सांप्रत इंग्रज लोक हिंदु लोकांपेक्षां शंभरपट शाहाणे झाले आहेत, व तें शाहाणपण हिंदु लोकांस प्राप्त व्हावें एतदर्थी ईश्वरानें हा मुलूख त्यांचे ताब्यांत दिला आहे, हें स्पष्ट दिसत आहे."

२. "स्वदेशीय राज्यें हल्लीं आहेत त्यांत काय गर्दी आहे ती पहावी, ह्मणजे बाजीरावाचें मूर्तिमंत राज्य डोळ्यांपुढें उभें राहातें. मक्तेमामलेदार चट सारी रयत लुटतात. जमा येते ती रांडा, गोंधळी, भट, आर्जवी, ढोंगी वगैरे खाऊन जातात. हेंच बाजीरावानें केलें, व अद्याप मराठी राज्यांत हेंच आहे. पहा ह्मणजे खातरी होईल. उजाडलें किंवा मावळलें याची त्यांस खबर नसते."

३. "ग्रंथ छापणारे यांस पैसा द्यावा, हें सर्वांपेक्षां उत्तम आहे. व या देशांत तर अति उत्कृष्ट हाच धर्म आहे. हें मूर्खांस शाहणें करण्याचें काम आहे. ह्मणून हाच धर्म सर्वांहून श्रेष्ठ आहे. अशी समजूत यांची पडेल तर त्वरित लोक सुधारतील, यांत संशय नाहीं, व असें झाल्यावांचून ग्रंथही पुष्कळ होणार नाहींत. परंतु ईश्वरेच्छा प्रमाण."

४. "इंग्रज हेच चांगले सुधारलेले लोक आहेत. यांचें राज्य या देशांत आहे हेंच चांगलें, व ईश्वरानें हे चांगले राजे आह्मांस दिले आहेत, हें खचीत दिसतें. याहून चांगले राजे आह्मांस कदापि मिळणार नाहींत. याशिवाय हें सरकार लोकांची सुधारणा करण्याकरितां अत्यंत मेहेनत करीत आहे. त्यांस विद्या शिकवितें, तीही कशा रीतीनें शिकवितें कीं लोकांस तर जुलूम वाटूं नये."

५. "पेशवाईंतील द्रव्य पुष्कळ अनुभविलें खरें. परंतु त्याचा परिणाम मूर्खपणाचाच झाला. आतां शंभर वर्षें सुख भोगिलें, आणि तेव्हां कांहीं ज्ञानसंपादनाचा व आपलें राज्य नीट चालविण्याचा यत्न केला नाहीं. ह्मणून आतां ५०० वर्षें इंग्रजांचे अंमलांत राहावें लागेल, आणि आतां ५०० वर्षांत जें शाहाणपण मिळवूं, तें दोनहजार वर्षें पुरेल. कधीं राज्य दुसऱ्याचे हातीं जाऊं देणार नाहीं."

६. "पहा! पेशवे, शिंदे, होळकर, भोंसले ह्यांच्या आपसांत लढाया किती झाल्या? वांकडें किती पडलें? मारामाऱ्या व द्वेष किती झाले? नाना फडणिसांस कैदेंत बसवलें कीं नाहीं? व शेवटीं राज्य बुडालें कीं नाहीं? जर सर्व एकमत असतें, तर असें कां होतें! पेशवे यांचें राज्य शंभर वर्षें होतें, त्या शंभर वर्षांत कोणती सुधारणा झाली आहे पहा! व इंग्रजांनीं शंभर वर्षेंच राज्य केलें, पण त्यांत किती सुधारणा झाली, लोकांस किती शहाणपण आलें? व पुढेंही किती येणार!"

७. "इंग्रज लोकांनीं हिंदु लोकांस, स्थितीवर आणण्याचा बहुत यत्न चालविला आहे, व देशांत स्वस्थता केली, व चोरलुटारू नाहींसे केले, हे त्यांचे मोठे उपकार आहेत. कितीकाळ जरी ब्राह्मणी राज्य चालतें, तरी सती बंद होतीना, पेंढार मोडतेंना, व बालहत्या बुडतीना. पहा बरें! पोरें बेलाशक मारीत होते, कोणी नवसाचीं पोरें टाकीत होते, कोणी मारून टाकीत होते, या प्रकारच्या चाली होत्या. कोणी स्त्रिया जाळून टाकीत, कोणी जीवंत पुरीत, कोणी गळ्यांत दगड बांधून बुडवीत. हें सर्व मूर्खपण कधींतरी हिंदू लोकांच्यानें बंद करवलें असतें काय?"

८. "सन १८३४ सालीं कंपनीची सनद २० वर्षांची बाहाल झाली, त्या समयीं या गोष्टीचा विचार पडला होता. कितीएक विलायतेंतील दयाळू लोक यांनीं सांगितलें कीं, इंग्रज लोकांचें राज्य ज्या रीतीनें चालतें त्याप्रमाणें हिंदु लोकांचें चालावें, तेव्हां कंपनीसरकारानें अशी शाबिती केली कीं, हिंदु लोक मूर्ख आहेत, त्यांस पार्लमेंट ह्मणजे काय हें ठाऊक नाहीं; यामुळें तेथें असें राज्य बसविल्यानें बखेडा मात्र होईल, व सर्व बेबंद होईल. पार्लमेंटांत बसणारे लोक मोठे शाहाणे पाहिजेत, त्यांचे मनांत लोकांचें हित नेहमीं वागलें पाहिजे, तेव्हांच ती सभा नीट चालेल. त्याप्रमाणें पार्लमेंटांत बसावयास 'सर्व हिंदुस्थानांत एकही योग्य मनुष्य मिळावयाचा नाहीं, ही मोठी अडचण आहे.

याजमुळें विलायतेंतील बादशाहानें कंपनीसरकारची सनद कबूल करून वीस वर्षेंपर्यंत कमाविशी कायम केली."

९. "स्वदेशाचे हितास झटावें ही मुख्य सुधारणा आहे. स्वदेशास जें हितावह तें करावें. जसें आपण मातोश्रीस वंद्य मानतों व तिच्या पोटीं जे आले ते सर्व बंधुप्रीतीनें वागतात, तद्वत् ह्या जमिनीवर जे आपण आहोंत, ते सर्व एकमेकांचे बंधु आहोंत, व हा देश आपणां सर्वांची मातोश्री आहे. याजकरितां कोणी सुखी व द्रव्यवान् असतील त्यांनीं बहुत लोक उपाशीं मरतात व दरिद्री आहेत, त्यांचें रक्षण होण्याचा प्रयत्न करावा. आपण सर्वांनीं आज दोनहजार वर्षेंपर्यंत यथेच्छ झोंप घेतली, व कांहीं उद्योग केला नाहीं, म्हणून आतांतरी जागृत होऊन काय आहे तें पाहूं व बुद्धीचा उपयोग करूं. मेल्यावर आपण एकमेकांस उपयोगीं पडणार नाहीं. तेव्हां या जन्मांत ही संधी लोकांवर उपकार करणेची आहे, ही सोडूं नये, व आयुष्याचा व्यय दुसऱ्याचे हिताकरितां करावा, तो व्यय सुखकारक आहे."

१०. "शाहाणपणाशिवाय कांहीं पराक्रम नाहीं. यास्तव हिंदुस्थानांत असे कोणी लोक प्रमुख होऊन त्यांनीं सर्व आपले लोकांस बळवान् व शहाणे करून ठेविले पाहिजेत. त्यांस नवीन द्रव्योत्पत्तीचे मार्ग दाखविले पाहिजेत. इंग्रजांनीं राज्य बलात्कारानें घेतलें असलें तर असो, परंतु व्यापार तर बलात्कारानें घेतला नाहीं ? त्यांतच हे लोक कां शाहाणे होत नाहींत ? इकडे काय करितां येईल ? तारवें करितां येतील. लोखंडाचा रस करितां येईल. भूमींतला कोळसा सांपडेल. कापड करितां येईल. इतक्या गोष्टी समजून आल्या म्हणजे किती कार्य झालें ? व लोक किती बळवान् होतील ? याप्रमाणें प्रथम असेंच होऊंद्या कीं, सर्व व्यापाराचा माल इकडेच व्हावा. विलायती नको. इंग्रजांस इकडील कच्चा माल खरेदी केल्याशिवाय निर्वाह नाहीं, यास्तव अशी गोष्ट केल्यानंतर राज्य मात्र त्यांचे हातीं राहील. राहिलेंतर काय चिंता आहे ? जो पैसा तिकडे ते नेतील, तो आपण जिन्नस देऊन खरेदी करून परत आणूं."

११ "इंग्रज लोक यांनीं इकडे राज्य संपादन केलें, याचें कारण काय? याचा विचार करितां दिसतें कीं, हिंदू लोकांमध्यें मूर्खपणा वाढला तो दूर होण्याकरितांच हे गुरु दूर देशांतून इकडे ईश्वरानें पाठविले आहेत. पहा, हिंदु लोकांस हा मोठा लाभ आहे कीं, इंग्रज लोकांचे राज्यामुळें हिंदु लोकांस जागृति जाहली, व पृथ्वीवर काय काय आहे, हें कळूं लागलें. ज्यास कोंकणापासून पुण्यापर्यंत प्रदेश माहीत, त्यास पूर्वींचे लोक मोठा माहितगार असें ह्मणत; परंतु आतां बहुतांस इंग्रजाचा देश इंग्लंड व अमेरिका माहीत झाली. हें सर्व इंग्रजांमुळें झालें. ईश्वरानें ही शाहाणपणानेंच योजना केली आहे. लोकांची झोंप जाण्यास दुसरा उपाय नव्हता. सती जाणें, जळसमाध घेणें, पोरें मारणें, प्रयागास करवत घेणें, जगन्नाथास रथ उरावर घेणें, व हिमालयांत स्वर्गास जाणें इत्यादि अघोरी व लज्जाप्रद चालींमुळें ईश्वराचा क्षोभ अत्यंत जाहला, तेव्हां दुष्ट लोकांस ताळ्यावर आणण्यास ईश्वरानें इंग्रज सरकारची योजना केली."

१२. "बाजीराव सन १८०२ त पळून जाऊन आपले बापाचे स्नेही इंग्रेज यांचे पाठीस पडला. आणि त्यानें त्यांची प्रार्थना केली कीं, होळकरानें माझें शहर लुटिलें, व शिंदे, होळकर, भोंसले, माझ्याशीं वितुष्ट करितात, तेव्हां पुनः गादीवर माझें स्थापन करणार समर्थ तुह्मी आहां. तेव्हां तह झाला. मुलूख देण्याचा वगैरे करार जहाला. नंतर इंग्रजांनीं मदत करून त्यास गादीवर बसविलें, व त्यांस कराराप्रमाणें मुलूख देईना. तरी त्यांणीं युद्धास आरंभ केला नाहीं. पुढें १८१७ त विश्वासघात करून बाजीरावानें लढाई आरंभिली. तेव्हां तो शासनास पात्र जाहाला.........बाजीरावाचें कर्म चांगलें नव्हतें. भट व भडवे मात्र त्याची स्तुति करीत, दुसरे सर्व त्यास कंटाळून राहिले होते, व इंग्रेजांस सर्व वश होते. तेव्हां इंग्रेजांनीं मुलूख घेतला. असे रीतीनें त्यांस मुलूख प्राप्त जाहला. तो त्यांनीं घ्यावा किंवा न घ्यावा असें कोणी विचारील, तर त्याचें उत्तर असें आहे कीं, अलपिष्टन साहेब यांस जें मानपत्र राजे वगैरेंनीं दिलें, त्यांत स्पष्ट लिहिलें आहे कीं तुह्मीं राज्य घेतलें हें बरें जाहालें."

१३. "आमचे लोकांनीं एकत्र होऊन पार्लमेंट मागावें आणि मुंबई, कलकत्ता अशा ठिकाणीं तें नेमून तेथें कांहीं इंग्रज व आपले सर्व जातींचे शहाणे शहाणे लोक त्यांत ठेवावे. आणि त्यांचे हुकुमानें कारभार चालवावा. म्हणजे विलायतींचे बादशाहज्यादीसही नाहीं म्हणवणार नाहीं. कारण कीं, विलायतेंत पार्लमेंट असावें व येथें नसावें, अशी आम्हीं कांहीं चोरी केली नाहीं. हा एक मोठा उपाय साध्य होण्याजोगा आहे. व दुसरा तूर्त दरिद्र मोडण्यास उपाय असा आहे कीं, ब्राह्मण लोकांनीं आपल्या मूर्खपणाच्या समजुती सोडाव्या, आणि केवळ कारकून आणि भट हे दोनच रोजगार आम्ही करूं, असें म्हणूं नये. या देशांत आणखी पुष्कळ रोजगार आहेत, व तेही आतां दिवसेंदिवस इंग्रज घेत चालले. सावकारी, शेतकी वगैरे इंग्रज करूं लागले. हेच रोजगार आपले लोकांनीं करावे. कोणते म्हणाल तर कांच, कापड, सुरी, कात्री, लांकडी सामान, घड्याळें, चाबूक, यंत्रें इत्यादि पुष्कळ वस्तु इकडे इंग्रज खपवतात. हीं सर्व आपले लोकांनीं करावयास शिकावें, व जेथें जो माल खपणार नाहीं, तो दुसऱ्या देशास घेऊन जावा, आणि तेथें विकावा. पुष्कळ देश आहेत. या गोष्टीचा शोध करावा, व इंग्रजांचें देशाचें सामान बंद करावें. किंबहुना आपलें सामान त्यांस द्यावें. परंतु त्यांचें आपण घेऊं नये. जो इकडे उत्पन्न होईल तितका माल द्यावा. विलायती कापड घेऊं नये. ह्यास्तव आपल्यास जाडीं मोठीं कापडें नेसावयास लागलीं, तर काय चिंता आहे! परंतु आपले देशाचें रक्षण करावें, असें झालें म्हणजे बहुत रोजगार राहतील. परंतु हें या लोकांस सुचत नाहीं."

१४. "हिंदुस्थानाच्या पराधीनतेचीं आठ कारणें:—

संस्कृत भाषा सुटून प्राकृत भाषा झाल्या, तेव्हां असा भ्रम पडला कीं, प्राकृत भाषण बोलावें, आणि ज्यांस विद्या पाहिजे त्यांनीं संस्कृत पढून विद्या शिकाव्या. १.

"जों जों प्राकृत भाषा वाढत गेली, तों तों संस्कृताचा अंधार झाला. विद्या जास्ती वाढविणें राहिलें. आणि लोकांची समजूत अशी पडली कीं,

ज्यांनीं संस्कृत ग्रंथ लिहिले, ते देव होते. आणि तसे ग्रंथ लिहिणें हें कांहीं मनुष्याचें काम नव्हे. २.

ब्राह्मणांचीं कुळें कायम झालीं. येणेंकरून जो ब्राह्मण मूर्ख, विद्या शिकत नाहीं, त्यास असें भय राहिलें नाहींच कीं, मूर्खपणामुळें नीचत्व येईल. त्यास असें वाटूं लागलें कीं, माझा जन्म ब्राह्मणकुळांत आहे, मग मी विद्या शिकलों काय, नाहीं काय, एकच. माझा ब्राह्मणपणा कोणी नेत नाहीं. ३.

देशांत राहणें वगैरे जे प्रतिबंध पूर्वींचे शास्त्रकारांनीं केले, त्यांचे हेतु न जाणून, त्यांस धर्म म्हणूं लागले. ४.

कलियुग निघालें आहे, यामुळें लोकांचा फार नाश व दुर्गुणप्रवृत्ति व्हावी, हा ईश्वरी संकेत आहे. असें भय शास्त्रकारांनीं लिहिलें आहे; तरी, त्यांचा हेतु न जाणून, लोक यथातथ्य मानूं लागले. ५.

लोकांत प्रारब्धवाद फार पडला. ६.

पूर्वींचे लोक ऋषि व देव होते, मनुष्य नव्हे. ह्यास्तव जें वडील करीत आले, तेंच करावयाचें, नवीन मार्ग काढायाचा नाहीं, अशी लोकांची दृढ समजूत. ७.

ज्या ज्या चालीरीति लोकांत आहेत, त्या सर्व धर्मच. व्यवहार धर्म, ईश्वरीभक्ति धर्म, पागोटें धोतर आंगरखा घालावा हा धर्म. सगळा धर्मच. ८.

ह्यांना मी **हिंदुनाशाष्टक** म्हणतों."

१५ "माझी सर्व जनांस एवढीच विनंति आहे कीं, तुम्हीं सर्व जण विचार करण्यास लागा, वाचावयास लागा, नवीन ग्रंथ व वर्तमानपत्रें वाचा, व तुमचे शेजारीं काय होतें आहे याचा विचार करा. इंग्रजांमध्यें कितीएक चांगले गुण आहेत व ते तुह्मांस प्राप्त व्हावेत ह्मणून ईश्वरानें त्यांची तुमची संगत घातली आहे, हें लक्षांत आणा. सारासार पाहा, परंपरा आंधळ्यांची माळ लागली ह्मणून तीच चालवूं नका. धर्मशील, ईश्वरतत्पर व्हा, या गुणांवाचून सर्व व्यर्थ आहे.

सत्य बोला, दुष्ट वासना सोडा, धर्मसुधारणा करा, ह्मणजे धर्म टाकू नका, परंतु त्याचा अर्थ घ्यावा तसा काळ पाहून घ्या, व ईश्वरसंबंधी व जगासंबंधी ज्ञान जगांत वृद्धिंगत करा. आळस सोडा, व तुमच्यामध्यें वास्तविक बुद्धिमान् असेल त्यास पुढारी करा, त्याचे अनुमतानें चाला. सर्व लोकांसीं जूट असूंद्या. आपसांत फूट नसावी, हें ध्यानांत वागवा. विद्या अधिक होऊन तुमचें पाऊल पुढें पडोंद्या. सर्व देशाची काळजी प्रत्येकानें करावी. राज्य कसें चाललें आहे, व राजा कोण, त्याची वर्तणूक कशी, हें पाहत जा. माहितगार व्हा....... ...... तुमचे संपत्तीवर तुह्मी लक्ष देऊन आळसांत राहूं नका. खरी नीति कोणती तें पाहा. पैसा खाऊं नका, रांडबाजी करूं नका. प्रपंच संसार भलाईनें करा. आपले शत्रूस देखील वाईट इच्छूं नका. शरीरानें व मनानें देखील पाप करूं नका, प्राणिमात्रावर दया करा. अपराध क्षमा होतील तितके करा. परंतु क्षमा न करण्याचा प्रसंग येईल तेथें क्षमा करूं नका. एकमेकांवर प्रीति करा. नित्य उठून ईश्वराचें भजन व प्रातःकाळीं चिंतन करीत जा. त्याजवळ क्षमा मागा. आपले हातून पापें व अपराध बहुत घडतात, त्यांची क्षमा भगवंताशिवाय करणार समर्थ कोणी नाहीं. ढोंग, सोंग, करूं नका. लबाडी सदा ईश्वरास दिसते. यास्तव ती कदापि करूं नका. कोणचेंही पाप करूं नये. तें फार वाईट. इहलोकीं क्षणभर सुख वाटेल. परंतु त्याचा झाडा द्यावा लागेल. मरायाचें आहे, हें नित्य मनांत आणा. तुह्मी आपले मुलांची काळजी करून त्यांस शाहणीं करा, व सर्व लोकांची काळजी करा. नित्य कांहीं तरी सर्व देशाचें कल्याण केल्याशिवाय एक दिवस जाऊं देऊं नका. मुख्य ईश्वरभजन करण्याचा मार्गच आहे कीं, कोणास दुःख देऊं नये, सर्व लोकांचें हित करावें, स्वदेशाचें हित इच्छावें, व परदेशाची हानि इच्छावी असें नाहीं. परंतु, सांप्रत आपले लोक फार वाईट अवस्थेंत आहेत. सबब फार खबरदारी ठेवावी कीं, या लोकांचें कल्याण होईल. तुह्मी आपल्यास योग्य करा, अब्रू वाढवा; पैका मिळाला तर अब्रू वाढते असें नाहीं. अब्रू, खरेपणा व निर्मळपणा यांपासून उत्पन्न होते. विद्या केली तर त्याप्रमाणें वागणूक लागते, नाहींतर विद्या व्यर्थ होय. विद्येचें सार्थक रोजगार नव्हे. ज्यांस विद्येचा अर्थ ठाऊक नाहीं, ते असें

ह्मणतात. परंतु पोट भरणारी ती विद्या नव्हे, ती मजुरी आहे. विद्या म्हणजे ज्ञान, जेणेंकरून मनुष्य निर्मळ होतो, विचारी होतो, समर्थ होतो. उनाड जे लोक आहेत, ते विद्येचें तात्पर्य द्रव्य मिळविण्याचें असें समजतात. परंतु विद्येपासून द्रव्यलाभही होतो, व दुसरे अनेक लाभ होतात. ”

ह्या उताऱ्यांवरून तुमच्या लक्षांत सहज येईल कीं, “**लोकहितवादी**” ह्यांस जरी पाश्चात्य उच्चशिक्षण फारसें मिळालेलें नव्हतें, तरी, एकंदरींत, पाश्चात्यांतल्या मोठमोठ्या ग्रंथकारांचे विचार त्यांच्या मनांत भरले होते, त्यांच्या सत्परिणाम त्यांच्या अंतःकरणावर चांगला झाला होता, आणि स्वराष्ट्राच्या खऱ्या हीताची दिशा त्यांस, उत्तम प्रकारें दिसली होती. आणि तदनुरूप त्यांचा हितबोध कोठें कोठें दासबोधाइतका सोज्वल वाटतो. ही गोष्ट त्यांस, त्यांच्या तेव्हांच्या परिस्थितीच्या मानानें अत्यंत भूषणावह दिसते. आणखी, हे पिढीजाद श्रीमंत असतां, ह्यांनीं आपला ऐषआराम एकीकडे ठेवून, केवळ स्वजनहितार्थ, इतकें चांगलें आणि इतकें लिहिलें आहे, हें मनांत आलें म्हणजे ह्यांच्या निरपेक्ष उद्योगाचें मोठें कौतुक वाटतें.

आतां विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या लेखांतले कांहीं उतारे देऊं. हे सगळे त्यांच्या निबंधमालेंतले आहेत. ह्यांत आपल्या सध्याच्या स्थितीचें निरूपण असून आपणांस तीपासून लाभ झाले आहेत ते, तिजपासून आपली हानि झाली आहे ती, ती हानि भरून काढण्याचे उपाय, इत्यादि गोष्टींचें विवेचन फार चांगलें केलें आहे, आणि त्या संबंधानें आपली कर्तव्यें काय आहेत, हें फार मार्मिक रीतीनें, उलटसुलट पर्यायांनीं, आणि पाश्चात्य विचारपद्धतीनें, फार रमणीय भाषेनें सांगितलें आहे. ह्यांच्या भाषेमध्यें अशी कांहीं विलक्षण चटक आहे कीं, त्यांच्या लेखांतला आशय नुसता मनांत उतरून स्वस्थ राहात नाहीं, तर त्यापासून चित्तास एक प्रकारची अत्यंत सुखदायक चेतना प्राप्त होते. ह्याचा अनुभव तुम्हांस थोडातरी येईल.

१. "आपणास जें खरें वाटतें तें स्पष्ट लिहिण्यास जो भितो किंवा तसें आपणाविरुद्ध कोणी लिहिलेलें ज्यास आवडत नाहीं, तो खरा सत्यनिष्ठ नव्हे, असें आम्ही समजतों."

२. "आम्हांस तर असें वाटतें कीं, असे विचार करण्याची शक्ति आमच्या अंगीं आणून त्यांचा उल्लेख उघडपणें करण्याची जी मोकळीक आमचें सरकार आम्हांस देत आहे, त्यापरतें औदार्य कोणतेंही नाहीं !"

३. "एकंदरींत आमचे वाचकांस एवढेंच सांगणें आहे कीं, इंग्लिश लोकांच्या उत्कर्षाचा नुसता हेवा करण्यापेक्षां त्यास कारण जे त्यांचे अनेक गुण, त्यांचा मत्सर करणें फार समंजस व शहाणपणाचें होय."

४. "शकुनांत तथ्य पाहूं जातां बिलकूल सांपडणार नाहीं. आतां त्यापासून अनर्थ कोणते कोणते आहेत ते पहा. एकतर हा निवळ भ्रम असल्यामुळें तो मनास चिकटल्यानें त्यास दुर्बलता प्राप्त होते; म्हणजे सदसद्विवेचनरूप उत्कृष्ट शक्ति परमेश्वरानें मनुष्याचे ठायीं ठेविली आहे, तिचा व्यापार ह्या अज्ञानजन्य भ्रमानें कांहींसा कुंठित होतो. शिवाय व्यवहारांत ह्याचे योगानें अनेक हानि झाल्या आहेत, व होत आहेत."

५. "आमचें ज्ञान म्हणजे इंग्रेजांचे उष्टेमाष्टे विचार, आमची सुधारणा ह्मणजे त्यांचें बालिश अनुकरण, आमचें कर्तृत्व म्हणजे पार्लमेंटच्या जागीं सार्वजनिक सभा, सेंटपॉल चर्चेच्या जागीं प्रार्थनामंदिर, व क्रिकेटच्या जागीं क्रीडाभुवन ! एतावता "इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः" या ह्मणीप्रमाणें आमच्यांत धड आमचें मूळचें तत्व राहिलें नाहीं, व आमच्या पाश्चात्य बंधूंच्या समागमें-करून नवें पाणी आम्हांत दृष्टीस पडूं लागावें तेंही अजूनतर आलें नाहीं. मग पुढें हें आमचें तारूं कोणत्या थडीला लागणार आहे तें परमेश्वर जाणे!"

६. "तेव्हां मनाचा दृक्प्रदेश वाढवून कोत्या समजुतीपासून व भ्रमांपासून इतिहास त्यांस मुक्त करितो, व आपणांविषयीं व इतरांविषयीं

यथार्थ बुद्धि मनांत आणून देऊन, इतरांशीं सलोख्यानें वागविण्यास तो आपणांस शिकवितो, हाही त्याच्या अध्ययनानें होणारा एक मोठा लाभ आहे. इंग्रजांचें राज्य या देशांत येऊन इतके दिवस टिकलें व पुढेंही बहुधा चिरकाळ असेंच अबाधित चालेल, याचें एक मोठें कारण त्यांच्यांत व मुसलमानांत जो मोठा भेद दृष्टीस पडतो तो होय. यांत संशय नाहीं."

७. "तर वरील महासाधनांच्या द्वारें आमचा येवढा सारा देश जो कुंभकर्णासारखा निद्रापद भोगीत स्वस्थ व सुस्त होऊन पडला आहे, त्यास हालहालवून जागें करण्याची प्रथमतः तजवीज झाली पाहिजे. हाच प्रकार यापूर्वी साऱ्या युरोपांत, फ्रान्स देशांत, व रशियांत झालेला आहे. अवघें युरोपखंड सोळाव्या शतकापूर्वीं आमच्या देशाप्रमाणेंच स्वस्थपणें घोरत पडलें होतें. पण चीन देशांतून मुद्रणकलेनें येऊन पाश्चात्य राष्ट्रांचे ठायीं वस्ती केली मात्र, तों लागलीच पन्नास साठ वर्षांत जिकडे तिकडे चळवळ सुरू झाली. ग्रीक व ल्याटिन ग्रंथांचा साऱ्या देशांत अभ्यास व्हावयाला लागून युरोपची बुद्धिदेवता फार दिवसपर्यंत जी निद्रिस्त झाली होती ती एकाएकीं जागृत झाली."

८. "तर आम्ही स्वातंत्र्याच्या स्थितीला योग्य नाहीं, व तसें असल्यामुळें आमचें प्रस्तुतचें पारतंत्र्य अत्यंत हितावह होय, हीं दोन्ही मतें निवळ खोटीं आहेत, असें आम्हांस वाटतें; व हीं अलीकडे आमच्या हृदयांशीं खिळून गेलीं आहेत. हेंच प्रस्तुत काळीं आमची स्थिति सुधारण्यास मोठें प्रतिविघातक आहे, यांत संशय नाहीं. आधीं तीरावरच ज्यानें पाय गाळले, तो काय पोहणार? रडतराव घोड्यावर कितीसे खंबीर स्वार होणार हें कोणीही सांगेल."

९. "आमच्या पूर्वजांच्या ध्यानींमनींही नव्हत्या अशा शेंकडों गोष्टी त्यांस कळूं लागून इंग्रजी विद्येचा अपरंपार सागर त्यांस दृष्टिगोचर झाला. या सागरांत जे अभिनिविष्ट होऊन त्याचें अवगाहन करूं लागतील ते परम

धन्य होत यांत कांहीं संशय नाहीं. व आमच्या देशाची जुलुमी अंमलदारांच्या पायीं कितीही हानि झाली, तरी ती वरील सागराच्या बला-वर कालेंकरून तरी भरून येईल, असा आम्हांस पूर्ण भरंवसा आहे. या भावी कालाचे सूचक अंकुर सध्यांही दृष्टीस पडूं लागले आहेत."

१०. "आमचे देशांत अलीकडे विद्येचा फैलाव थोडा झाला आहे असें नाहीं. पण या विद्येच्या योगानें जें वास्तविक ज्ञान निष्पन्न व्हावें, व जी मनाची थोरवी वाढावी, त्यांतलें अजून कांहींच दृष्टीस पडूं लागलें नाहीं, असें ह्मण-ण्यास हरकत नाहीं. त्यांतून **इंग्रेजी विद्या ही तर वस्तुतः पाहतां वाघिणीसारखी आहे; तिचे दुधावर जो पोसला, तो लेंचापेंचा कधींच निपजूं नये. उत्साह, धैर्य, अश्लाघ्य कर्माचा तिरस्कार, स्वाव-लंबन, इत्यादि उदात्त गुण वरील भाषेंतील ग्रंथांच्या अध्ययनापा-सून उत्पन्न होणारे आहेत.** पण आजपर्यंतच्या तऱ्हेवाईक शिक्षणपद्धतीनें ह्मणा, अगर तितका संस्कार आमचे ठायीं बिंबला नसल्यामुळें ह्मणा, वरील गुणांचा उदय अद्याप तर कांहींच झालेला दृष्टीस पडत नाही."

११. "तर देशस्थिति सुधारण्याचा राजमान्य मार्ग म्हटला म्हणजे लोकांस ज्ञानसंपन्न करणें हा होय. ही संपन्नता सिद्ध करण्याचीं मोठीं दोन साधनें म्हटलीं ह्मणजे रसना व लेखनी हीं होत. पहिल्या सदराखालीं शाळा व व्याख्यानें हीं येतात. व दुसऱ्याखालीं वर्तमानपत्रें, मासिक पुस्तकें व ग्रंथ हे येतात. या दोन्ही साधनांचा उत्कर्ष होऊन या अज्ञानांध राष्ट्राचे डोळे उघडावे एतदर्थ आमच्या थोर व दयाळू सरकारानें आजपर्यंत थोडा उद्योग केला आहे असें नाहीं. युनिव्हर्सिटी ( विद्यापीठ ), विद्यालयें, शाळा, वगैरें-ची स्थापना करून आज वर्षांनवर्षे त्यांची व्यवस्था चालविली आहे, व देश-भाषांची वृद्धि व्हावी ह्मणूनही होईल तितका यत्न सरकारनें केला असून अजूनही तो चालला आहेच. पण सरकारनें आपलें काम बजावलें ह्मणून

तितक्यानें काय झालें ! आम्हीं स्वतः मोठे कर्तृत्वाचे पडलोंना ! आमच्या तोंडावर अचानक जांभूळ पडलें तरी तें आंत लोटायालाही आणखी कोणी पाहिजेच ! आमची मर्दुमकी असली कीं, रडतरावाप्रमाणें आह्मांला घोड्या-वर बसवून शिवाय आमच्या हातून लोकांनीं तरवारही मारिली पाहिजे ! वस्तुतः पहातां सरकारनें जर इतका पल्ला मारला, तर बाकीची मजल आह्मीं मोठ्या संतोषानें व उत्साहानें केव्हांच आटपावी. येवढा ज्ञानाचा प्रवाह आडवून घरोघर त्याची मालकी जर आमच्या सरकारनें आमच्या नवीन बंडांस दिली, तर नलिकाद्वारें, घरोघर उदकसंचय करण्याचें अलपस्वल्प कामही त्यांच्यानें होऊं नये ? पण हें करतो कोण; व गरज कोणाला ? शिवाय असें करण्यापासून कांहीं फायदा होण्यासारखा आहे, हें तरी कोणा-च्या अंतःकरणांत विंबलें आहे ?"

१२. "तर आमच्या देशांत राजसत्तेचें अशा प्रकारचें स्वरूप आहे. हें स्व-रूप इकडील देशांत तर अगदींच अदृष्टपूर्व आहे, हें सांगायला नकोच. आतां कांहीं अंशीं तें आम्हांस हितावह आहे व कांहीं अंशीं गैरफायद्याचें आहे, हें थोडा विचार केला असतां कोणासही दिसून येणारें आहे. एकच मनुष्य राजपदावर नियुक्त असला ह्मणजे तो ज्या तऱ्हेचा मनुष्य असेल त्याप्रमाणें प्रजेचें हित किंवा अहित होण्याचा संभव असतो. थोरल्या माधवरावासारखा किंवा अकबर बादशहासारखा प्रभु असला ह्मणजे सारी प्रजा आबादानी भोगते व सुख पावते. तीच शेवटल्या रावबाजीसारखी किंवा महंमद तघ-लखासारखी स्वारी सिंहासनारूढ झाली ह्मणजे झाली "बेबंद नगरी व झोटिंग पाच्छाई" सुरू ! हा प्रकार प्रस्तुतसारख्या राज्यांत घडण्याचा संभव बहुधा नाहींच म्हटला असतां चालेल. कां कीं, वैसराय साहेब झाले तरी त्यांस कायद्याचें बंधन आहेच. इकडे दूरच्या दूर राहून चार दिवस धांशीरामी चालविण्याचा जर त्यांनीं घाट घातला, तर लागलीच त्यांस तिकडून थप्पड येईल, व वारन हेस्टिंगची आठ वर्षें धिंड निघाली तशी शोभा निजधामास गेल्यावर होईल ती निराळीच."

१३. "रावणानें जसे सर्व देव काबीज करून कोणाची पाककर्मावर, कोणाची संमार्जनावर, वगैरें नेमणूक करून साऱ्यांस सारखें राबविलें होतें, त्याप्रमाणेंच आमच्या प्रस्तुतच्या राज्यकर्त्यांनीं सर्व महाभूतें वठणीस आणून त्यांजपासून ते चोपून कामें घेत आहेत. मग अशा अद्भुत प्रभावाच्या राष्ट्राशीं जर आपला आयताच योग जमून आला आहे, तर ही केवढी सुदैवाची गोष्ट समजली पाहिजे ! रशियाचा पहिला बादशहा पीटर दि ग्रेट् यास आपला देश सुधारावयाचा होता, तर हातचें राजवेत्र टाकून व बादशाही पोषाक फेंकून देऊन मजुराचा धडधाकट डगला व हत्यारांची पेटी हीं त्यास पतकरावीं लागलीं. मग पाश्चात्त्यांची अपूर्व विद्या जर आपल्या पायांनीं आमच्या देशास चालून आली आहे, तर ही केवढी मोठी सोय आम्हांस झाली आहे बरें!"

१४. "आतां विद्याकला वगैरेंच्या संबंधानें भरतखंडवासी लोकांत व श्वेतद्वीपीय राष्ट्रांत कितीसें अंतर आहे तें पाहूं. हें अंतर वरच्या साऱ्या अंतराप्रमाणेंच स्पष्ट आहे. अमेरिकेंत प्रतिवर्षीं नवीन विद्या व कला उदयास येत आहेत. आज काय नाद धरण्याची युक्ति सांपडली. ती अशी कीं अमक्या अमक्यानें आज वक्तृत्व केलें, किंवा अमकीअमकीनें आज खूप शानदार आलाफ घेतले, तर तेंच बोलणें व तेच आलाफ व तेंच गाणें यंत्रावर धरून ठेवून पाहिजेतर न्यूफौंडलंड बेटांत सन १८८२ सालीं ऐकावें. उद्यां काय मेघकन्या जी विद्युत्, तिला वाहक करून अग्निरथाचे जागीं विद्युद्रथ निघाला ! परवां काय सूर्यकिरणासच दूत करून 'मेघदूता'वर ताण केली ! याप्रमाणें पाश्चात्त्यांच्या बुद्धिसागराचे एकेक तरंग मेघमंडळावरही जाऊन आदळताहेत. आमचे देशांत पहावें तों नव्या विद्या व कला तर राहिल्याच, पण हजारों वर्षें ज्यांची येथें वस्ती झाली, त्या सुद्धां बिचाऱ्या निराश्रित होत्सात्या विगलित होऊं पहाताहेत, व कित्येक तर झाल्या सुद्धां! दवलताबादीच्या जागीं फूलस्क्यॉप आला, आंबव्याच्या जागीं साटीन आली, आणि कषायांच्या जागीं विलायती रस आले, 'हरहर'च्या जागीं 'हडेलहप' येऊन बसलें, शालजोडीच्या जागीं गौन आला. याप्रमाणें क्रमाक्रमानें आदेश होत गेले."

१५. "तेव्हां हें सिद्ध आहे कीं, आह्मांस सांप्रतच्या दुरवस्थेंतून जर निघावयाचें असेल तर आमच्या सांप्रतच्या राज्यकर्त्यांशीं बिघडून आह्मांस बिलकुल सोय नाहीं. जो प्रसंग पडला आहे, त्यास सादर होऊन त्यांच्या सलोख्यानेंच जें कार्य होईल तेवढें करून घेतलें पाहिजे. ह्या सलोखा होण्यास दिवसेंदिवस अधिकाधिक सोयीही होत चालल्या आहेत. पूर्वीं टोपकरांचा स्पर्श होतांच सचैल स्नान करावें अशा ज्या आमच्या ठिकाणीं आमच्या पाश्चात्य बंधूंविषयीं समजुती होत्या, त्या आतां पुष्कळ कमी होऊन त्यांचें वैभव व थोरवी हीं आतां आमच्या पुरतीं लक्षांत येऊन चुकलीं आहेत. त्याप्रमाणें हिंदू ह्मणजे आफ्रिकेंतील निग्रो लोकांचे बंधु ही जी आकाशांतील बापाच्या पवित्र लेंकरांनीं चोहोंकडे समजूत पसरून दिली होती, तींतही आतां इतकें अंतर पडलें आहे कीं, जगाच्या चारी खंडांत गीर्वाणवाणीचा घोष सुरू होऊन अमेरिकेंतली मंडळी अर्धा गोल वलांडून आह्मांस कडकडून भेटण्याकरितां व आमच्या प्राचीन ऋषींचा आह्मांपासून अनुग्रह घेण्याकरितां आह्मांकडे उड्या टाकूं लागली आहे. तसेंच अर्वाचीन शास्त्रांनीं व कलांनीं, सारें भूमंडळ एकमय करून टाकून पवित्र शास्त्रांतील सार्वलौकिक बंधुत्वाचें जें पोकळ मत, त्यास यथार्थता आणण्याचा योग आणला आहे. खेरीज या शतकांत राजांच्या सत्तेस धक्का बसून त्यांचें माहात्म्य किती कमी होत चाललें आहे, व लोकप्रभुत्व व स्वातंत्र्य हीं तत्त्वें चोहोंकडे किती जारीनें पसरत चाललीं आहेत, हेंही आज कोणाही शोधक मनुष्याला अश्रुत नाहीं. तर वरील सर्व गोष्टींचा विचार केला असतां या देशाविषयीं कळकळ बाळगणाऱ्या कोणाही मनुष्यास मोठी उमेद येण्यासारखी आहे कीं, हल्लींच्या निष्कृष्टावस्थेंतून निघून हिंदुस्थानानें पुनः आपलें नांव जगांत गाजवावें असें होण्यास दिवसेंदिवस अधिकाधिक उपाय सिद्ध होत आहेत."

१६. "आपणांहून विद्वान् असणाऱ्या मनुष्याशीं समागम घडला असतां जसा आपणांस नेहमीं फायदा असतो, त्याचप्रमाणें सध्यां इंग्लंड व हिंदुस्थान या दोन देशांचा जो निकट संबंध जडला आहे, त्यापासून विशेषतः

हिंदुस्थानास बहुत लाभ होण्यासारखे आहेत, हें कोणासही कबूल करणें भाग आहे. एकाद्या शाहण्या मनुष्याच्या बरेंचसें भांडवल हवालीं केलें असतां तो जसा लवकरच दामदुप्पट करून दाखवितो, व उत्तरोत्तर बहुगुणित अर्थ-संचय त्यापासून निष्पन्न करतो, त्याप्रमाणेंच प्राचीन ग्रीक, रोमन, हिंदु, आरब वगैरे लोकांपासून पाश्चात्त्यांनीं जें ज्ञान संपादन केलें, तें त्यांनीं आपल्या उद्योगानें अलीकडे पुष्कळच वाढविलें आहे, यांत संशय नाहीं. पूर्वीं जीं अनेक शास्त्रें होतीं, तीं त्यांनीं नवीन शोध सामील करून वाढविलीं आहेत, व दुसरीं तर पूर्वीं अज्ञात असलेलीं नवीं काढून त्यांचा बहुत विस्तार केला आहे. तेव्हां हल्लीं हें अपरंपार भांडवल आयतेंच आमच्या स्वाधीन होणारें आहे, मग हा का लहानसाहान लाभ म्हणावा ! त्यांतून कोणत्याही उद्देशानें म्हणा, हें सर्व अपूर्व भांडार आमच्या राज्यकर्त्यांनीं बळेंबळें आमच्या गळ्यांत बांधण्याचा हा आज वीस पंचवीस वर्षें अव्याहत उद्योग चालविला आहे, व त्यास यशही पुष्कळ आलें आहे. तेव्हां आमचा व इंग्रेजांचा समागम झाल्यापासून हें एक मोठें फल आम्हांस प्राप्त झालें आहे."

१७. "तर एकंदरींत सांगायाचें हें कीं, **सज्ञानदशेचें फळ देशोन्नति हें, होय.** यास्तव आमच्या देशांत जों जों इंग्रेजी विद्येचा प्रसार होत जाईल, तों तों सुधारणा, स्वातंत्र्य, सुख यांचा प्रसार अवश्य होत जाणार. एक इंग्रजी विद्येचें वज्र आमच्या हातांत असलें म्हणजे मग लिटनूशाही, टेंपलशाही, चाटफील्डशाही, मूरशाही वगैरे शंभर शाह्यांस सुद्धां आम्ही दाद देणार नाहीं ! याखेरीज इतर जे लाभ प्रस्तुत राज्यापासून या देशास झाले आहेत, ते सर्वांस मशहूर आहेतच. पूर्वीं ज्या प्रकारची स्वस्थता या देशास बहुधा कधींही प्राप्त झाली नसेल, तशा प्रकारची गेल्या पन्नास साठ वर्षेंभर येथें नांदत आहे. इंग्रजी होण्याच्या पूर्वीं प्रत्यहीं होणाऱ्या ज्या गोष्टी, म्हणजे लढाया, मारामाऱ्या, पेंढारीदंगा वगैरे, त्या आतां साऱ्या स्वप्नवत् झाल्या आहेत. पाश्चात्य राज्याच्या विस्तीर्ण छायेखालीं हें अवघें भरतखंड खुशाल झोपेंत घोरत आहे असें म्हटलें तरी चालेल ! आढ्याला पाय लावून बिनधोक

निजण्याचा काळ या राष्ट्रास पूर्वीं कधींही लाधला नाहीं ! काठीला सोनें बांधून काशीपासून तों रामेश्वरापर्यंत जावें अशी जी सदरील कारकीर्दींची लोक तारीफ करतात, ती अगदीं वाजवी आहे. त्याप्रमाणेंच पूर्वीं या देशाचा व्यापार जो संकुचित होता, तो आतां साऱ्या जगभर होण्याच्याही उत्कृष्ट सोई झाल्या आहेत. आगगाड्या, आगबोटी, तारायंत्रें, टपाल ह्या सर्वांपासून व्यापारी लोकांचा किती फायदा होत आहे व होण्यासारखा आहे, हें कोणालाही उघड करून सांगायाला पाहिजे असें नाहीं. त्याप्रमाणेंच एकंदर लोकांचेंही वरील यंत्रविद्येपासून किती हित झालें आहे व होण्यासारखें आहे, याविषयींही येथें कांहीं लिहिण्याची जरूर नाहीं. त्याप्रमाणेंच मानसिक स्वातंत्र्य हाही या काळांत सर्वांस झालेला एक मोठाच लाभ आहे. मानसिक स्वातंत्र्य म्हणजे हवातसा विचार करण्याची व तो विचार वाग्द्वारा किंवा लेखनद्वारा प्रसिद्ध करण्याची मोकळीक. हिंदु राज्यांत या प्रकारची मोकळीक जरी बरीच होती, तरी मुसलमानी राज्यांत या संबंधानें बराच अटकाव होता, हें इतिहासप्रसिद्धच आहे. औरंगजेबानें महंमदाची निंदा केल्याबद्दल संभाजी महाराजांची जीभ कापून टाकिली, टिपूच्या त्रासानें दोन हजार वैष्णवांनीं एकदम आत्महत्या करून घेतली, इत्यादि सर्व प्रकार प्रस्तुत राज्यांत केवळ अश्रुत आहेत. मिशनरींच्या द्वारें परस्पर काम झाल्यास बरेंच, असा जरी इंग्रेज लोकांचा अंतस्थ हेतु आहे, तरी उघडपणें ख्रिस्ती धर्माच्या प्रीत्यर्थ कोणाही मनुष्यास या राज्यांत बिलकुल इजा पोंचत नाहीं, व आजपर्यंत पोंचलीही नाहीं. प्रख्यात वक्ता पिट्ट यानें एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं "इंग्लिश मनुष्याचें घर हा त्याचा किल्ला आहे" हीच गोष्ट बऱ्या प्रकारें आमच्या देशासही लागू झाली आहे. मागें मोंगलाईंत किंवा पेशवाईंत जसें राजानें हवें त्याला उचलून बंदींत टाकावें किंवा त्याचा प्राणही घ्यावा तसा प्रकार प्रस्तुतचें राज्य परकी लोकांचे असतांही येथें होऊं शकत नाहीं. हें तर काय, पण टेंपलसाहेबांस एकीकडे मानपत्र मिळतें, आणि एकीकडे प्रत्येक सभासदाच्या हातांत टेंपलशाहीचा इंग्रेजी पोवाडा पडतो; मूरसाहेब आज जकातीचे धारे होयबा रावबहादुरांच्या मान डोलावण्या-

वरून पास करतात, व दुसऱ्या दिवशीं पुणेंशाही छोकऱ्यांनीं थोडीशी गड-बड केली न केली तों 'बुढ्ढे' मंडळीस सरकारांतून खाशी थप्पड येते, इत्यादि गोष्टींकडे जो कोणी क्षणभर लक्ष पुरवील, त्याची अशी खात्री झाल्यावांचून खास राहणार नाहीं, कीं हल्लींच्या राज्यांत आम्हांस जितकें स्वातंत्र्य आहे, तितकें यापूर्वी स्वदेशीय राजांच्या उत्कृष्ट कारकीर्दींतही कधीं नव्हतें. त्याप्रमाणेंच आमचे लोकच अत्यंत साहसशून्य व अगदीं पोंचट होऊन गेले आहेत. नाहीं तर या स्थितींतही त्यांचा किती उत्कर्ष होण्यासारखा आहे, हेंही बहुधा सर्वांच्या लक्षांत येण्यासारखें आहे!"

ह्या उताऱ्यांत विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे मुख्य विचार प्रगट झाले आहेत. त्यांतले कितीएक विचार, तात्त्विक दृष्ट्या, देशमुखांच्या विचारांशीं अगदीं पूर्णपणें मिळतातसे दिसतात. तरी, लिहिण्याची चपेट कांहीं वेगळी आहे. दुसरे कांहीं विचार असे आहेत कीं, ते प्रत्यक्ष अगदीं पाश्चात्त्य आहेत. ते, चिपळूणकरांनीं, स्वबुद्धिचातुर्यानें आपल्या राष्ट्रास लावून, त्यांची चर्चा मनोरम केली आहे. तिच्यायोगानें त्यांचे लेख फार खोल आणि पीळदार झाले आहेत. ह्यांचे लेख पीळदार आणि चपेटदार आहेत, त्यांवरून कितीएक लोक त्यांवर असा आरोप कधीं कधीं करितात कीं, त्यांचा सगळा रोंख सर्वप्रकारीं सध्याच्या मन्वंतराच्या विरुद्ध होता, आणि सध्या जें आपणांस प्राप्त झालें आहे, तें सगळें अनिष्ट आहे, असें वाचकांच्या मनांत भरविण्याचा प्रयत्न ते करीत असत. परंतु तें अगदीं खोटें आहे. एवढेंच केवळ नव्हे, तर त्यांचे लेख वाचतांना केव्हां केव्हां असें वाटतें कीं, हिंदुस्थानांत इंग्लिश राज्य स्थापित झाल्याच्या योगानें हिंदुस्थानास जे लाभ झाले आहेत, आणि होत आहेत, त्यांची खरी खरी मोठी किंमत आमच्यांतल्या सुशिक्षित ग्रंथकारांमध्यें ह्यांच्या इतकी दुसऱ्या फारच थोड्या ग्रंथकारांस

कळली होती. आणि किंमत कळणें हेंच काय तें मुख्य झालें पाहिजे. आपल्या राष्ट्राच्या उन्नतीचा खरा मार्ग हाच आहे. ह्याचेंच अवलंबन आमच्यांतल्या ग्रंथकारांनीं अधिकाधिक केलें पाहिजे. तें गोपाळराव आगरकरांच्या लेखांत बरेंच दृष्टीस पडतें. त्यांचे कांहीं उतारे आतां पहाः—

१. "धार्मिक, राजकीय व सामाजिक सुधारणांपैकीं प्रथम कोणती होते व करावी, याविषयीं कितीही मतभेद असला तरी, सामाजिक व धार्मिक सुधारणा करण्यास आज आह्मांस जितका काळ अनुकूळ प्राप्त झाला आहे, तितका पूर्वीं कधींच प्राप्त झाला नव्हता. ह्याविषयीं मतभेद होण्यास बिलकूल कारण नाहीं असें वाटतें. हें खरें असेल, तर ह्या वेळेस हात पाय न हालवणें ह्मणजे जाणून—बुजून आत्महत्या करून घेण्यास प्रवृत्त होण्यासारिखें होय."

२. "कोणत्याही कारणानें उद्योगी मनुष्याशीं गांठ पडल्यास एक तर त्याप्रमाणें उद्योग करण्यास, किंवा त्याच्या आधीन होऊन तो ठेवील त्या स्थितींत राहण्यास तयार झालें पाहिजे. सध्या आह्मां निरुद्योगी हिंदु लोकांची उद्योगी इंग्रज लोकांशीं गांठ पडली आहे. तेव्हां एकतर आह्मीं त्यांच्या सारखें उद्योग करण्यास राजी झालें पाहिजे, किंवा ते ठेवतील त्या स्थितींत राहण्यास सिद्ध झालें पाहिजे. आमचें भावी स्वातंत्र्य अथवा आमचें निरंतर दास्यत्व सर्वैथैव आमच्या उद्योगावर अवलंबून आहे."

३. "राष्ट्रीय स्वातंत्र्य राखण्यास लागणाऱ्या गुणांचा आह्मांत पूर्णपणें लोप झाला आहे; व त्यांचा फिरून आविर्भाव होऊं लागून त्यांची बरीच वृद्धि होईपर्यंत तें फिरून प्राप्त होण्याची आशा करणें अगदीं व्यर्थ आहे. राजकीय स्वातंत्र्य जाणें ही अत्यंत खेदजनक गोष्ट खरी. हें जाणें ह्मणजे शरीरांतील

सर्व इंद्रियें आणि त्यांचे व्यापार यांचें पोषण जें चैतन्यसारतत्त्व तें नाहींसें होणें होय. पण तें गेलें ह्मणून रुदन करीत बसण्यांत काय अर्थ आहे? जगावयाचें असेल, व जगणें तें चांगल्या प्रकारचें जगणें हवें असेल, तर तें चैतन्यसारतत्त्व फिरून आपल्या हातीं येण्याचा प्रयत्न केला पाहिजे. व सांप्रतकाळीं राष्ट्रसभादि साधनांच्या द्वारें तो जितका होण्यासारखा आहे, तितका आह्मी करीत आहों."

४. "तथापि येवढें खास ह्मणतां येईल कीं, आमच्या सुधारणेस खळ पडल्यापासून ज्या स्थितींत आह्मी कुजत पडलों आहों, त्याच स्थितींत आह्मांस युगेंच्यायुगें लोटावयाचीं असतील, तर आम्हीं एकदम नाहींसें व्हावें हें इष्ट आहे! ज्यांना कधींही चांगला दिवस येण्याची बिलकूल आशा नाहीं, त्यांनीं चैतन्याला बिलगून रहाणें हें शुद्ध पिसेपण नव्हे काय? आह्मांस अशी दशा येऊन ठेपली आहे असें आह्मी पाहिजे तर ह्मणत नाहीं. पण, गेल्या दोन हजार वर्षांचा जो आमचा इतिहास आहे, त्यावरून पाहतां केवळ जीवरक्षणापलीकडे आह्मीं कांहींएक केलें नाहीं, असें ह्मणणें भाग पडेल. आणि पुढेंही जर अशाच रीतीनें वागण्याचा आमचा विचार असेल, तर आह्मी मोठे अद्वितीय जंतु आहों, असें मानिलें पाहिजे."

५. "आह्मी असा प्रश्न करतों कीं, इंग्रज लोकांनीं तुह्मांस जिंकलें त्या वेळीं तुह्मांत कोणत्याही प्रकारचे सामाजिक किंवा धार्मिक तंटे नव्हते, त्या वेळेस राजकीय सत्ता तुमच्या हातीं असून सामाजिक व धार्मिक प्रकरणांत तुमचें पूर्ण एकमत होतें. असें असून परशत्रूस तुह्मी हार कां गेलांत! सैन्यबल, द्रव्यबल, संख्याबल इत्यादि यशाचीं बाह्योपकारणें तुमच्या हातीं असून, व धार्मिक व सामाजिक गोष्टींत तुह्मांत द्वैत माजलेलें नसून, तुमची अशी दाणादाण कां झाली? व पंचवीस चाळीस वर्षांच्या आंत तुह्मी इतके वीर्यहीन कसे झालां? आम्हांस असें वाटतें कीं, पेशवाईचा जो मोड झाला तो आमची सामाजिक व धार्मिक स्थिति जशी पाहिजे तशी नव्हती ह्मणून झाला."

६. "आह्मी सरकारच्या साह्यानें वैवाहिक गुलामगिरीचा अंत लौकर करूं पाहात आहों; आमचे प्रतिपक्षी ती आपणांस वाटेल तितकी वर्षे राखून ठेवण्याबद्दल धडपड करीत आहेत! परकें सरकार असल्यामुळें तें, आमचें ह्मणणें न्याय्य व हितावह असून, आमच्याकडे व्यक्तिसमुदाय मोठा नाहीं ह्मणून आमचा पक्ष घेण्यास भीत आहे, व आमच्या प्रतिपक्ष्यांचें वर्तन अपायकारक व निर्दय असून त्यांकडे व्यक्तिसमुदाय मोठा आहे, ह्मणून त्यांच्या झोंकाप्रमाणें वागत आहे, ही शोचनीय स्थिति सरकारच्या परकेपणामुळें चालली आहे. इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, युनायटेड स्टेट्स वगैरे देशांत असल्या गुलामगिरीचा केव्हांच अंत झाला असता. ह्या देशांत स्वराज्य असतें व त्यांतील मोठमोठ्या अधिकाऱ्यांच्या डोक्यांत ही कल्पना येती, तर त्यांनीं ती केव्हांच अमलांत आणून सोडली असती."

७. "ज्या देशांत आपले शेंकडों पूर्वज जन्मास आले, वाढले व मरण पावले, ज्या देशांतील हजारों पिढ्यांनीं अनेक गोष्टींत मोठ्या कष्टानें केलेल्या अनेक सुधारणांचें फळ आपणांस आयतें प्राप्त झालें, अशा देशांतील धर्माचा, रीतरिवाजांचा, व लोकांचा सर्वथैव त्याग करणाऱ्या मनुष्यास खऱ्या सुधारकाची पदवी कधींही शोभणार नाहीं. स्वभूमींत, स्वधर्मांत, स्वलोकांत व स्वाचारांत राहून अविचारी व अज्ञान देशबांधवांच्या निंदेस किंवा छलास न भितां, त्यांच्याशीं कधीं भांडून, कधीं युक्तिवाद करून, कधीं लाडीगोडी लावून, अथवा सामर्थ्य असलयास कधीं त्यांना दटावून त्यांची सुधारणा करणें यांतच खरी देशप्रीति, खरी बंधुता, खरा देशाभिमान, खरें शहाणपण व खरा पुरुषार्थ आहे."

८. "आतां ब्रिटिश सरकाराला आपल्या धर्मांत हात घालूं देणें बरोबर नाहीं, ह्या विधानांत किती जीव आहे तें पाहूं. धर्मांत हात घालणें ह्मणजे त्यांत फेरफार करणें. लोकांच्या अन्य विचारांत फेरफार होत गेले ह्मणजे त्यांच्या धर्मविचारांत फेरफार होत जातात, हें कोणत्याही धर्माच्या इतिहासावरून सिद्ध

करून देतां येणार आहे. पाश्चिमात्य शिक्षणामुळें व इतर कारणांमुळें आह्मां-सही आमच्या धर्मांत थोडाबहुत फेरफार करावा असें वाटूं लागलें आहे. तेव्हां हा आतां करायाचा कोणीं ? सारे शंकराचार्य निःसत्व होऊन बसले आहेत, सरकार परधर्माचें आहे, लोकांस आपण होऊन चळवळ करून नव्या स्मृति घालण्याचें सामर्थ्य नाहीं. तेव्हां सध्याच्या स्थितीस अनुकूळ असे फेरफार कोण करणार ! प्रतिपक्षी ह्मणतात कीं ते लोकांनीं करावे, आह्मीं ह्मणतों कीं मोठमोठे फेरफार सरकारच्या साह्यावांचून व्हावयाचे नाहींत. निदान आम्ही जसल्या स्थितींत आहोंत, तसल्या स्थितींत तरी व्हावयाचे नाहींत."

९. "आपल्या इकडील तत्त्ववेत्त्यांत व शास्त्रज्ञांत एक मोठा दोष दिसून येतो. तो हा कीं, त्यांना आपल्या समजुतींप्रमाणें आचरण करण्याची उत्कट इच्छा किंवा धैर्य होत नाहीं. "पुराणांतलीं वांगीं पुराणांत" अशा पद्धतीनें आमच्यांतील विद्वान् ह्मणविणाऱ्यांचें वर्तन बहुधा होत असल्यामुळें दुर्मति, दुराग्रह व दुष्ट चाली यांचें ठाणें या देशांत कायम झाल्यासारखें झालें आहे. बाकी, ज्या देशांत भास्कराचार्यांसारखे ज्योतिषी होऊन गेले, त्या देशांत अजूनपर्यंत चंद्रग्रहण किंवा सूर्यग्रहण आलें असतां, कांहीं वेळ थंड पाण्यांत निष्कारण बुड्या मारण्याची, उपवास करण्याची, भलत्या भलत्या वस्तूंचीं दानें करण्याची, मूर्खपणाच्या मंत्रांचा जप व सिद्धि करण्याच्या फंदांत पडण्याची, पापडलोणच्यावर व दहींदुधावर तुळशीपत्रें घालीत बसण्याची, आणि जणूं काय आपणांस सुतक्यानेंच स्पर्श केला आहे कीं काय असें समजून स्त्रीपुरुषांनीं धोतरांपात्रांसकट डोकीवरून पाणी घेण्याची चाल अजूनपर्यंत दृष्टीस पडावी काय !"

१०. "आम्ही स्वतंत्र असतों तर अमेरिकेप्रमाणें परक्या देशांतून येणाऱ्या माला-वर हवी तेवढी जकात आह्मांस ठेवतां आली असती, व तसें करून ह्या देशांतील कित्येक धंद्यांना उत्तेजन देतां येऊन ते आह्मांस व इतर देशांस फायदेशीर

होतील, अशी त्यांची स्थिति करतां आली असती. येथें कापूस पिकतो; मजुरीचे दर माफक आहेत; लांकूड व कोळसा हवा तितका पैदा होण्यासारखा आहे; असें असून येथला कापूस परदेशांत जातो, आणि तेथें त्याचें सूत व कापड बनून तें येथें विकण्यास येतें, व तें येथील कापडाहून सवंग मिळतें. वास्तविक पाहतां हिंदुस्थानांत उत्पन्न होणारें कापड अमेरिकेच्या कापडाइतकें सवंग पडायाला पाहिजे आहे. पण, ज्या साधनांनीं अमेरिकेंतील कापडांच्या कारखान्यास उत्तेजन देतां आलें, तीं साधनें हिंदुस्थानांतील कापसाच्या कारखान्यांस उत्तेजन देण्याच्या कामीं लावण्याचें सामर्थ्य आमचे अंगीं नसल्यामुळें सरकारच्या मदतीवांचून ते जसे चालवतां येतील, तसे चालवणें आह्मांस भाग पडत आहे. याचप्रमाणें येथल्या व्यापारी व राजकीय सुधारणांची गोष्ट होय.''

११. ''जिकडे पाहावें तिकडे पाश्चिमात्य कल्पनांनीं व आचारांनीं आह्मांस वेढल्यासारखें झालें आहे, व त्यांच्या पेंचांतून आह्मांस निसटून जातां येईल असें वाटत नाहीं! पण निसटून जाण्याचा प्रयत्न करण्याची तरी काय गरज आहे? ज्या युरोपियन कल्पनांचा प्रघात इकडे पडत आहे, त्यांपैकीं जेवढ्या अहितकारक असतील तेवढ्या वर्ज करून बाकीच्यांचा अंगीकार करण्यास काय हरकत आहे? दुसऱ्या विषयांविषयीं लिहीत असतां, असें दाखविलें आहे कीं, युरोपांत आज जी सुधारणा दृष्टीस पडत आहे, ती मागील अनेक सुधारणांचें सार आहे, व ज्या राष्ट्रांस जीवनार्थकलहांत टिकावयाचें असेल त्यांना त्या सुधारणेचा स्वीकार केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. हें खरें असेल तर ती सुधारणा आपल्या घरीं चालून आली असून आपण तिचा निषेध करणें ह्मणजे आपल्या हातानें जाणूनबुजून आपलें नुकसान करून घेण्यासारखें होय. निदान आमची तरी अशी समजूत आहे कीं, इंग्रजांच्या राज्यामुळें ज्या गोष्टी येथें प्रस्थापित झाल्या आहेत, व होऊं पाहत आहेत, त्यांपैकीं बहुतेक स्वीकारणीय व अनुकरणीय आहेत. सबब त्यांचा येथें जो आपोआप प्रसार होत आहे, त्यास विरुद्ध जाणें हें तर इष्ट नाहींच. पण

ज्यांना त्यांचें चांगुलपण समजण्यासारखें शिक्षण मिळालें आहे, त्यांनीं बुद्धिपुरस्सर त्यांचा स्वीकार व प्रसार केला पाहिजे. असें केलें तरच त्या लौकर मूळ धरतील, आणि त्यांच्या फळांचा लाभ थोड्या वर्षांत आह्मांस होऊं लागून जीवनार्थकलहांत हार न जाण्याची आशा आह्मांस करतां येऊं लागेल."

१२. "ज्या देशांत प्रतिवर्षी कोट्यवधि मनुष्यप्राणी जन्मास येत आहेत, व परलोकास जात आहेत, त्या देशाच्या एखाद्या कोंपऱ्यांत एखाद्या शतकांत एखाद्या व्यक्तीनें किंवा लहानशा व्यक्तिसमुदायानें थोडीशी चळवळ केली, तर तेवढीवरून येवढें विस्तीर्ण राष्ट्र वास्तविकपणें सचेतन असून त्याची प्रगति होत आहे, असें म्हणतां येत नाहीं. चंद्रगुप्तापासून रावबाजीपर्यंत जो आमचा लांबच्यालांब इतिहास आहे, किंवा जो आम्हीं लांबच्यालांब काळ घालविला, त्यांत तोडरमल्ल, पूर्णया, किंवा भवभूति यांसारिखे कांहीं पुरुष होऊन गेले, अथवा राजपुतान्यांतील रजपुतांसारखे किंवा महाराष्ट्रदेशांतील मराठ्यांसारखे कांहीं लढवय्ये होऊन गेले, असें सांगितल्यानें आमच्या ऐतिहासिक शून्यतेस विशेष बाध येतो, असें आम्हांस वाटत नाहीं. खरें म्हटलें तर चंद्रगुप्तापूर्वींच आमचा राष्ट्रचंद्र मावळला होता, असें म्हणण्यास हरकत नाहीं. दोन किंवा अडीच हजार वर्षांपूर्वीं ज्या प्रकारच्या राज्यविचारांनीं, धर्मविचारांनीं, व सामाजिक विचारांनीं आम्ही निगडित झालों होतों, व त्या वेळीं ज्या आचारांचे आम्ही गुलाम होतों, तेच आचार व तेच विचार अद्यापि आम्हांस बहुधा आपल्या कह्यांत ठेवीत नाहींत काय ? कोणतीहि अचेतन वस्तु बहुधा दोन हजार वर्षे टिकत नाहीं. पण टिकलीच तर तींत जमीनअस्मानाचें अंतर झाल्याखेरीज रहावयाचें नाहीं. पण आम्ही पहा आकाशासारखे अथवा समुद्रासारखे जसेच्यातसे ! बिचाऱ्या आकाशाच्या किंवा समुद्राच्या स्थितींत देखील येवढ्या कालान्तरानें शास्त्रज्ञ प्रेक्षकांच्या नजरेस येण्यासारखा फेरफार होत असेल, किंवा झाला असेल, पण आमच्या शोचनीय परिस्थितींत गेल्या दोन हजार वर्षांत म्हण-

ण्यासारखा फेरफार झाला आहे, असें बहुधा कोणाही विचारी पुरुषास म्ह-णतां येणार नाहीं."

१३. "येथें राहणाऱ्या पांच कोटि लोकांच्या जागीं दहा कोटि लोक झाले असतील, किंवा दहांचे जागीं वीस कोटि झाले असतील; सिथिअन लोकांनीं आमची मानगुटी सोडली असेल तर ती मुसलमानांनीं धरली असेल, व मुसलमानांनीं सोडली असेल, तर ती इंग्रजांनीं धरली असेल; जेथें पूर्वीं जमिनीचा एक बिघा लागवडींत होता, तेथें आतां तीन असतील, व जेथें पूर्वीं दहा खोपटीं होतीं, तेथें आतां कदाचित् शंभर असतील. कधीं मुसल-मानांपुढें घट्ट तुमान व लांब आंगरखा घालून कोंपरांपासून सलाम करीत पळावें लागत असेल, तर कधीं पाटलून व बूट चढवून आणि कोट घालून विलायतेच्या गोऱ्यांपुढें धांवावें लागत असेल; पूर्वीं मर्जीविरुद्ध कर द्यावे लागत असतील, तर आतां कदाचित् ते कायद्यानें द्यावे लागत असतील. पूर्वींचे राज्यकर्ते उघड उघड पक्षपात करीत असले, तर आतांचे कदाचित् न्यायाच्या पांघरुणाच्या आड करीत असतील. पण असल्या स्थित्यंतरास स्थित्यंतर म्ह-णावें किंवा नाहीं, याचा आम्हांस बराच संशय आहे. अगदीं अलीकडे लाख पन्नास हजार लोकांच्या आचारविचारांत जें अन्तर पडलें आहे, तें सोडून द्या; तें पडूं लागे तोंपर्यंत आमच्यांत म्हणण्यासारखा काय फेरफार झाला होता, व ह्या घटकेस देखील सामान्य लोकांच्या स्थितींत म्हणण्यासारखा काय फरक पडला आहे, हें आम्हांस कोणी समजावून सांगेल तर आम्ही त्याचे मोठे आभारी होऊं. 'राजा कालस्य कारणं.' राजा आई, राजा बाप, राजा करील ती पूर्वदिशा, लोक राजाचे गुलाम, ह्या ज्या आमच्या नीच राजकीय कल्पना, त्या जशा रामराज्यांत होत्या, तशा अजूनही कायम आहेत. ज्याला ह्याचें प्रत्यंतर पाहिजे असेल, त्यानें बडोदें, इंदूर, लष्कर, हैदराबाद, म्हैसूर वगैरे पाहिजे त्या लहानमोठ्या नेटीव संस्थानांची फेरी करून तेथील जुन्या पद्धतीच्या लोकांचे विचार व आचार कसे आहेत, यांची बारकाईनें चौकशी करावी. या संस्थानांच्या शास्त्यांपैकीं एखाद्यानें आपल्या प्रजेपैकीं

एखाद्याला केवळ चैनीखातर चाबकाचा खरपूस मार दिला, अथवा राखेचा तोबरा चढवून पाठीवर भला मोठा दगड दिला, किंवा प्रसंगविशेषीं एखाद्याचे नाहीं तसले हाल करून खूनही केला, तरी देखील भोगणाराचे आप्त किंवा इतर लोक आपल्या स्वामीविरुद्ध उठावयाचे नाहींत ! ही आमची राजभक्ति व राजनिष्ठा! धिक्कार असो आम्हांला, आमच्या राजभक्तीला, आणि आमच्या शास्त्यांला ! सारेच एका माळेचे मणि ! आज मितीस कोणत्याही नेटीव संस्थानांत ब्रिटिश पोलिटिकल एजंटच्या सान्निध्यांत असा प्रकार घडत असेल असें आम्ही म्हणत नाहीं. पण घडल्यास निदान आमचे लोक तरी आपण होऊन बोभाटा करणार नाहींत, अशी आमची पक्की खातरी आहे. अशा राजभक्तांनीं परक्या लोकांच्या झुंडींच्या झुंडी आपल्या देशांत येऊं दिल्या, आणि एकाच्या जुलुमाचें जूं निघालें नाहीं तों दुसऱ्याच्या जुलुमाचें जूं आपल्या मानेवर घेतलें, आणि आपल्या बायकांपोरांसह शतकेंच्या शतकें, हवेतसे हाल सोसीत हीन दास्यावस्थेंत काढलीं, यांत नवल तें काय ! ग्रीक लोकांना अशा स्थितींत एक वर्ष देखील काढवलें नसतें, मग शतकांची काय कथा !”

इतके उतारे बस झाले. ह्यांवरून पाश्चात्त्य विद्येच्या संस्कारानें आमच्यांतल्या विचारी माणसांचे कल्पनांचे ओघ कसे वाहूं लागले आहेत, हें तुमच्या लक्षांत येईल. एकंदरींत, “पदरीं पडलें आणि पवित्र झालें” हें व्रत धरल्याशिवाय सध्यांतर दुसरी गति आपणां लोकांस नाहीं, असें झालें आहे. म्हणून, सगळे दुराग्रह एकीकडे ठेवून हें व्रत धरणें भाग आहे, हें तुम्हीं आपल्या होतकरू पुढच्या पिढ्यांच्या अंतःकरणांत बिंबविलें पाहिजे. आणखी ह्या तिघां नामांकित ग्रंथकारांची एकवाक्यता एका मोठ्या विचारांत फार जबरदस्त आहे. तो विचार हा कीं, कोणत्याही कारणांनीं म्हणा किंवा कोणत्याही विलक्षण योगांनीं म्हणा, हिंदुस्थानच्या लोकांस धार्मिक,

सामाजिक, व्यावहारिक आणि राजकीय व्यवहारांत आपली सुधारणा करून घेण्यास इंग्लिश सरकारची कारकीर्द हें एक अपूर्व पर्व प्राप्त झालें आहे, ह्याचा उपयोग करून घेण्यास आह्मी विसरतां कामा नये. शिवाय, तुम्हांला असें कळून येईल कीं, पाश्चात्त्य विद्येच्या आणि विचारांच्या संस्कारानें आपल्या देशबांधवांच्या अंतःकरणांत आपल्या धार्मिक, सामाजिक आणि राजकीय स्थितीविषयीं चांगला प्रकाश पडत चालला आहे. ह्या विषयांच्या संबंधानें, जगांतलीं इतर विद्याचारसंपन्न राष्ट्रें आजपर्यंत काय करीत आलीं आहेत, आणि सध्यां काय करीत आहेत, हें आमच्या मंडळीस समजूं लागलें आहे. हें ज्ञान प्रबल आहे; तेजस्वी आहे; अन्याय सहन करणारें नाहीं; जुलुमास भिणारें नाहीं; खोट्यास मान्य होणारें नाहीं; सत्यास अंतर देणारें नाहीं; न्यायाची कांस सोडणारें नाहीं; दुसऱ्यास भिऊन मागें सरणारें नाहीं; उगाच धमकीला डरणारें नाहीं; धर्मवेडाच्या नादीं लागणारें नाहीं; जनरूढीस डोक्यावर बसूं देणारें नाहीं; पैशास हात जोडणारें नाहीं; विपत्तीस जुमानणारें नाहीं; आणि दुसऱ्याची छाप आपणांवर बसूं देणारें नाहीं. हें शेवटीं विजयी व्हावयाचें आहे. हें आपल्या मंडळीस इतरांपेक्षां श्रेष्ठ करणार आहे; इतरांस आपणांपुढें हात टेंकायास लावणार आहे; इतरांस आमच्या भजनीं लावणार आहे; इतरांस आमची पूजा करायास भाग पाडणार आहे; किंबहुना, तें आपणांस उत्तम म्हणून सर्व कांहीं जें आहे, तें प्राप्त करून देणार आहे. आणखी, ह्या ज्ञानाची प्राप्ति आणि अभिवृद्धि होण्यास, सर्व साधनांत अत्युत्तम साधन वाङ्मयाचा अभ्यास होय. तुम्हीं सूक्ष्म विचार करून पाहिला तर तुम्हांला असें कळेल कीं, आजपर्यंत जीं माणसें मोठीं पराक्रमी

म्हणून होऊन गेलीं, त्यांच्या मस्तकीं वाङ्मयाचा वरदहस्त होता. शिवाजीमहाराज घ्या, नेपोलियन बोनापार्ट घ्या, गौतमबुद्ध घ्या, पैगंबर महमद घ्या, श्रीशंकराचार्य घ्या, सर ऐझाक न्यूटन घ्या, भास्कराचार्य घ्या, लार्ड बेकन घ्या, जार्ज वाशिंगटन घ्या, ग्लाडस्टन घ्या, बिस्मार्क घ्या, लार्ड राबर्टस् घ्या, मोल्टके घ्या, कोणी घ्या, त्यांच्या थोरपणाच्या बीजाचें पृथक्करण केलें म्हणजे असें स्पष्ट दिसून येईल कीं, त्यांत वाङ्मयाच्या सहवासाच्या अथवा अभ्यासाच्या फलाचें कांहीं विशेष प्राबल्य आहे. जगाच्या पुढें चांगलें म्हणून जें काय येत आहे, त्याची उत्पत्ति चांगल्यापासूनच झालेली असली पाहिजे; आम्रफलें आम्रवृक्षालाच यावयाचीं, तीं कधीं धोतऱ्याच्या झाडास यावयाचीं नाहींत. आणि जें काय चांगलें म्हणून झालेलें आहे, त्याचें वसतिस्थान वाङ्मय आहे. तेव्हां, वाङ्मय हें सगळ्या कल्याणाचें मूळ आहे, असें झालें. ही सर्व सामान्य वाङ्मयाची गोष्ट झाली. ही, ज्याच्या त्याच्या मोठेपणाप्रमाणें ज्यास त्यास लागू पडावयाची आहे. आपलें वाङ्मय लहान नाहीं. फार मोठें आहे. तो समुद्र आहे. आणि तो पाहिजे तितका वाढवितां येण्यासारखा आहे. तो वाढविण्यास इंग्लिश वाङ्मयासारखा साह्यकारी देवानें आपल्यास आपल्या घरांत आणून दिला आहे. इंग्लिश वाङ्मय केवळ कल्पवृक्ष आहे. त्यापाशीं पाहिजे तें मागा. तें देण्यास तो तयार आहे. युरोपियनांचें बैबल मागा, मुसलमानांचें कुराण मागा, हिंदूंचे वेद मागा, बौद्धांचे ग्रंथ मागा, पृथ्वीच्या पाठीवरच्या रोम, ग्रीस, इराण फ्रान्स, जर्मनी, युनैटेडस्टेटस, रशिया इत्यादि कोणत्याही देशाचे अर्वाचीन किंवा प्राचीन इतिहास मागा, वैद्यकग्रंथ मागा, शिल्पग्रंथ मागा, राजनीतिग्रंथ मागा, पुराणें मागा, गानवादनशास्त्रग्रंथ मागा, राज्यक्रांतीच्या कथा मागा, पाहिजे

तें मागा, देण्याची तयारी आहे. जणुंकाय अमक्या एका विषयावर आपल्या संग्रहीं ग्रंथ नाहीं, असें म्हणायाचें नाहीं, असें त्यानें व्रतच घेतलें आहे. दूरची गोष्ट नको. आमच्यांतल्या कांहीं शोधक मंडळीस श्रीशिवाजीमहाराजांचें साद्यंत आणि यथातथ्य चरित्र लिहावयाचें आहे, ती मंडळी त्या संबंधाची कांहीं माहिती, विलायतेंतल्या महा-संग्रहालयांतल्या जुन्या ग्रंथांवरून आणि त्यांच्या भाषांतरावरून मिळविण्याचा भगीरथ प्रयत्न करीत आहे. शिवाय, आमच्या वेद-वाक्यांच्या अर्थाविषयीं सांप्रत काळीं आमचे इकडचे मोठमोठे नामांकित पदवीधर पंडित डा. हौ, मोनियर विलियम्स, मोक्षमुल्लर इत्यादि युरोपस्थ ज्ञानसंपन्नांच्या मतांस विशेष मान देत असतात, हें मी तुम्हांला सांगितलें पाहिजे असें नाहीं. ह्याचें तात्पर्य असें आहे कीं, युरोपियन लोकांनीं आमचे इकडचें ज्ञान आपल्या वाङ्मयांत नेऊन भरिलें आहे. त्या विषयींच्या त्यांच्या उत्कंठेचीं उदाहरणें पुष्कळ आहेत, त्यांतलें एकच येथें सांगतों. पहिला गव्हर्नरजनरल वारन हेस्टिंग्स् ह्यास, काशी येथील चेतसिंगाच्या दंग्याच्या वेळीं, चवताळ-लेल्या बैराग्यांचा वेढा पडला असतां, तितक्यांत त्यास पारशी भाषेच्या व्याकरणाविषयीं जें काय कळलें, त्याचा संग्रह त्यानें तेथें करून घेतला. असे उद्योग आज शेंकडों वर्षें चालले आहेत. त्यांच्या योगानें त्यांची ज्ञानसंपत्ति अपरंपार वाढली आहे. आणि दुसरा चमत्कार असा झाला आहे कीं, ह्या इंग्लिश वाङ्मयाच्या संगतीनें हिंदुस्थानांत फ्रेंच वाङ्मय आणि जर्मन वाङ्मय आलें आहे. तींही वाङ्मयें अशींच ज्ञानपरिप्लुत आहेत. अशा मंडळीसह-वर्तमान एवढा मोठा साह्यकारी आपल्या महाराष्ट्र वाङ्मयास आ-जपर्यंत कधीं मिळाला नाहीं, आणि पुढेंही कधीं मिळावयाचा नाहीं. ह्याचा

उपयोग आह्मीं करून घ्यावा. म्हणजे, इंग्रजींत सगळ्या जगाचें ज्ञान-भांडार भरलें आहे, तें महाराष्ट्रांतल्या जामदारखान्यांत आणून भरण्याविषयीं आम्हीं नित्य प्रयत्न करावा, हेंच आमचें सध्यांचें सगळ्यांत मोठें आणि अत्यंत पवित्र कर्तव्य आहे. चिपळूणकरांनीं इंग्लिश विद्येला वाघीण म्हटली आहे. तशी आपल्या महाराष्ट्र भाषेला वाघीण बनवायाची आहे. ती तशी बनली म्हणजे तिच्या दुधाच्या सेवनानें, आपण, चांगले वाघांसारखे बळाढ्य, उत्साही, धैर्यशाली, अश्लाघ्य कर्मांचा तिरस्कार करणारे, आणि स्वावलंबी असे होऊं. आणि इंग्लिश वाङ्मयाच्या प्रसादानें आम्ही तसे—इंग्लिशांसारखे—झालों आहों, असें जेव्हां जगास दाखवूं, तेव्हांच कृतकार्य होऊं. ह्यांत इंग्लिश लोक आणि आम्ही महाराष्ट्री लोक ह्या दोघांचीही धन्यता आहे. कां कीं, त्यांत गुरुत्व आणि शिष्यत्व ह्या दोहोंची सार्थकता आहे.

येथें थोडें द्रोणपर्वांतल्या कथेचें स्मरण होतें. द्रोणाचार्य गुरु आणि अर्जुन त्यांचा शिष्य, असें असतां, द्रोणाचार्यांनीं धर्मराजास धरून दुर्योधनाकडे न्यावें, असें ठरलें तेव्हां, द्रोणाचार्यांस असें भय वाटलें कीं, जावत्कालपर्यंत धर्माचें रक्षण अर्जुन सन्निध राहून करीत आहे, तावत्कालपर्यंत आपणांस त्यास धरतां यावयाचें नाहीं. त्या प्रसंगाचें वर्णन पंतांनीं केलें आहे, तें फार चित्तवेधक आहे. द्रोणाचार्यांनीं मंडळीस म्हटलें:—

## आर्या.

"परि जरि हरिसारथि मज धर्माला गांठितां न लक्षील<br>
तरि करिन कार्य हें मी भीमादि न अन्य शूर रक्षील. १.

याकरितां सर्व तुम्ही तो कुरुसंतानिनलिनरवि[1] रोधा
विजयापुढें कवण जय पावेल करूनि बळि नर विरोधा. २.

जरि म्यां प्रथम पढविला बाळपणीं पुत्रसाचि खेळविला
तरि मदधिक कीं तेणें परमेशास्त्रप्रसाद मेळविला. ३

वृद्ध ब्राह्मण मी तो तरुण क्षत्रिय मला न आटेल
भार्गवनदीजसमर[2] स्मरतां मद्वचन सत्य वाटेल. ४.

न्याल उपायें अर्जुन दूर तरि धरिन रणांत धर्मातें"
या सांतरवैरदानें[3] पावे बालिशसमूह शर्मातें. ५.

ह्यावरून, द्रोणाचार्य अर्जुनास किती भीत होते, तें व्यक्त होतें. परंतु, आणीबाणीच्या वेळीं, आपलें नातें मनांत आणून, अर्जुनानें, शिष्यत्वानें, द्रोणाचार्यांशीं जें वर्तन केलें, तें आम्हांस येथें आठवावें, आणि त्याप्रमाणें आम्हीं आमच्या इंग्लिश गुरूंशीं वर्तावें. त्यांत सर्व येणार आहे. त्याचें वर्णन पंतांनीं केलें आहेः—

## आर्या.

कृष्णानुमतें अंजलि जोडुनि अर्जुन म्हणे "अहो गुरुजी
'स्वस्त्यस्तु'[4] म्हणा द्या मज शिष्या आशी जयप्रदा गुरु जी. १.

पांडुसम युधिष्ठिरसम कृष्णसम तुम्ही त्रिनेत्रसम महित
करिल प्रसाद तुमचा जेंवि तसें नाकनाथ[5] न मम हित. २.

प्रेम असामान्य करी गुरुराज दयालु जनक सामान्य
तें न स्मरेल जो तो होईल कृतघ्न जन कसा मान्य. ३.

---

१ कुरुकुल हेंच नलिन (एक कमल) त्याचा नाश करणारा सूर्य. (नलिन कमलें सूर्योदय झाला ह्मणजे कोमेजतात.) २ परशुराम व भीष्म ह्यांचें युद्ध. ३ अंतर ज्यांत ठेविलें आहे, असा वर देण्यानें. ४ कल्याण असो. ५ इंद्र.

या दुर्भेद्य व्यूहीं इच्छितसें आज मी शिरायास
तुमचा प्रसाद नसतां होइल माझा वृथा चिरायास[1]" ४.

हेंच आम्ही आमच्या गुरूंस अनन्यभावें म्हणतों, आणि त्यां पाशीं मागतों. कां कीं, एक गुरूचा आशीर्वाद असल्यावर विद्येची सार्थकता होण्यास दुसऱ्या कशाचीही गरज लागत नाहीं, हें आम्हां महाराष्ट्रीयांस पूर्वींपासून ठाऊक आहे.

झालें. महाराष्ट्र वाङ्मयाविषयीं तुम्हांला जें काय सांगावयाचें होतें, तें सांगितलें आहे. हें कथन म्हणजे त्याच्या वृत्तांतांतलें कांहींच नाहीं—खंडींत पाव रती नाहीं—असें म्हटलें तरी चालेल. तरी, ह्या विषयाच्या अवलोकनाविषयीं ह्यावरून तुमचे ठायीं इच्छा उत्पन्न होईल, अशी आशा आहे. आपल्या महाराष्ट्र वाङ्मयाची सध्याची स्थिति इंग्लंडाच्यासारखी मोठा गर्व वाहण्यासारखी नाहीं आहे. इंग्रजीच्या मानानें फारच कमी आहे. तरी, इंग्रजीच्या साहचर्यानें त्यास इंग्रजी वाङ्मयाची बरोबरी करतां येण्यासारखी आहे. आणखी ती गोष्ट आपल्या लोकांच्या हातची आहे. तिजविषयीं उद्योग आम्ही करूं लागलों तर त्याच्या आड कोणाच्यानें येववणार नाहीं. त्यांत कोणाच्यानें हात घालवणार नाहीं. त्यावर कोणाच्यानें कर किंवा जकात बसववणार नाहीं. त्याला सैन्य नको आहे. दारूगोळा नको आहे. गाड्याघोडे नकोत आहेत. सरकाराची परवानगी नको आहे. आणि तो उद्योग, उन्हाळा, पावसाळा, हिंवाळा कांहीं असो, दिवस असो कीं रात्र असो, आम्हांस आणि आमच्या वंशजांस एकसारखा युगांचीं युगें चालवितां येण्यासारखा आहे. त्याच्या अभिवृद्धीचा परिणाम इतका सर्वमान्य, इतका पवित्र, इतका अप्रतिबंध, आणि इतका उदात्त आहे कीं, मनांत कांहीं असलें तरी त्याला

१ चिरकालीन परिश्रम.

नांव ठेवण्यास कधीं कोणाची जीभ वाहावयाची नाहीं. हे सिद्धांत निर्विवाद आहेत. ह्यांविषयीं सगळ्या विद्याचारसंपन्न राष्ट्रांची बालंबाल खात्री झाली आहे. आणि इतर विद्याचारसंपन्न राष्ट्रांप्रमाणें इंग्लंडास त्याच्या वाङ्मयाचा फार मोठा गर्व वाटत आहे. त्याविषयींचे विद्वान इंग्लिश लोकांचे उद्गार, प्रसंगानुसार, फार बाहेर पडत असतात. तसे उद्गार, आज साठ वर्षांमागें लार्ड मेकाले ह्या नामांकित ग्रंथकाराच्या भाषणांत एडिंबरो येथें निघाले होते. त्यांत सगळें अमृत भरलें आहे. त्यांची बरोबर प्रतिमा मराठी भाषेंत उठावयाचीच नाहीं. तरी, ते येथें दाखल केल्याशिवाय आमच्यानें राहवत नाहीं. म्हणून आम्ही ते येथें जशाचे तसेच देतों:—

"I have been requested to invite you to fill your glasses to the Literature of Britain; to that literature, the brightest, the purest, the most durable of all the glories of our country; to that literature so rich in precious truth, and precious fiction; to that literature which boasts of the prince of all poets and of the prince of all philosophers; to that literature which has exercised an influence wider than that of our commerce, and mightier than that of our arms; to that literature which has taught France the principles of liberty, and has furnished Germany with models of art; to that literature which forms a tie closer than the tie of consanguinity between us and the commonwealths of the valley of the Mississeppi; to that literature before the light of which impious and cruel superstitions are fast taking flight on the banks of the Ganges; to that literature, which will in future ages instruct and delight the unborn millions who will have turned the Australasian and Caffrarian deserts into cities and gardens. To that literature of Britain, then! And wherever British literature spreads, may it be attended by British virtue and by British freedom."

ह्याचा अर्थ तुम्हीं समजून घ्यावा. तो
यावयाचा नाहीं. ह्यांत इंग्लिश वाङ्मयाच
तो अपरंपार आहे. ह्यांत अगदीं शेवटीं
"जेथें जेथें मिळून हें ब्रिटिश वाङ्मय
ब्रिटिशांचे सद्गुण आणि ब्रिटिशांचें
समागमें पसरोत." आणखी आम
आमचे सद्गुण आमचेजवळ आहेतच,
णांची आणि ब्रिटिश स्वातंत्र्याची भर पडली
सर्व कांहीं मिळालें असें होईल. आणि त्याचें मुख्य
शास्त्री चिपळूणकरांस उत्तम प्रकारें कळलें होतें. म्हणूनच, त्यांच्या लेखणींतून "इंग्रजीविद्या ही तर वस्तुतः पाहतां वाघिणीसारखी आहे. तिचे दुधावर जो पोसला, तो लेंचापेंचा कधींच निपजूं नये," असे उद्गार निघाले आहेत. ह्या वरच्या इंग्रजी उताऱ्याचा आशय असा आहे कीं, इंग्लिश राष्ट्रास जें काय वैभव प्राप्त झालें आहे, तें मिळवायाच्या सगळ्या साधनांत इंग्लंडाच्या वाङ्मयाची साम्यता पावणारें असें दुसरें एकही प्रबल साधन नाहीं. फार काय सांगावें! त्याच्या पुढें त्यांस त्यांच्या देशाच्या व्यापारास आणि त्यांच्या सैन्यास प्राप्त झालेले विजयही तुच्छ वाटतात! आणि तें कांहीं खोटें नाहीं. थोडें असें पाहा. हिंदुस्थानांतल्या इंग्लिश राज्यस्थापनेच्या उत्तमोत्तम फळांत तेलंग-रानड्यांसारख्या पुरुषरत्नांची गणना आहे. हीं रत्नें इकडे पैदा होण्यास मुख्य साधन इंग्लिश वाङ्मय आहे, इंग्लिशांचा व्यापार नाहीं आहे, इंग्लिशांचें बाहुबल नाहीं आहे, किंवा इंग्लिशांचें यंत्रज्ञान नाहीं आहे. इंग्लंडाहून मोठमोठीं सैन्यें, मोठमोठे तोफखाने, मोठमोठीं यंत्रें, आणि कोट्यवधि रुपयांचा दुसरा माल हीं सगळीं हिंदुस्थानांत येऊन, जर एक तेवढें इंग्लिश वाङ्मय इकडे आलें नसतें, तर शेट

स. गोविंद रानडे, काशिनाथ त्रिंबक तेलंग
ा उत्पन्न झालीं नसतीं. आणखी हीं
—विश्वविद्यालयें, पाठशाळा, राष्ट्रीयसभा,
; इत्यादि लोकोन्नत्युत्पादक संस्थांचीं नांवें
र्तीं. मग त्या संस्था चालण्याची वार्ता
गेंपुढें इंग्लंडास आपल्या हिंदुस्थानांतल्या
चा प्रसंग कोठें आल्यास, सगळ्या जगास
मूर्ति दाखवून जें मोठेपण किंवा थोरपण
ोठेपण किंवा भूषण, ब्रह्मदेश किंवा हबशीदेश
पुढें करून मिरवितां यावयाचें नाहीं. ह्याचें कारण समंजस माणसांस सहज कळण्यासारखें आहे. प्लासीच्या लढाईच्या वृत्तांतापेक्षां विश्वविद्यालयाच्या पदवीदान समारंभांतलीं अध्यक्षांचीं भाषणें विशेष पवित्र, विशेष मान्य आणि विशेष ग्राह्य असलींच पाहिजेत. आणखी हिंदुस्थानाचा खरा उद्धार म्हणजे हिंदुस्थानांतलीं माणसें तेलंगरानड्यांसारखीं होणें हाच आहे; आणि हा उद्धार इंग्लिश वाङ्मयानें—म्हणजे त्या वाङ्मयांतल्या इंग्लिश शब्दांनीं नव्हे—तर त्यांतल्या विचारांनीं, बोधांनीं, आणि तदुत्पन्न अप्रतिम स्वाभिमानानें, इभ्रतीनें, आणि तेजस्वितेनें व्हावयाचा आहे. त्यास परमेश्वरकृपेनें आरंभ झाला आहे. हा क्रम असाच चांगला चालावा. इंग्लिश वाङ्मय हें सगळें महाराष्ट्र वाङ्मय व्हावें, म्हणजे कालेंकरून हिंदुस्थान हें इंग्लंडाइतकें सर्वगुणसंपन्न होईल. आणि हिंदुस्थानाचा उद्धार काय तो तोच आहे. परमेश्वर करो, आणि तो एकदा लवकर होवो!